

असतील. पण मी नाही विसरलो. त्या भेटीतला रवीन्द्रबाबांचा तो खोचक प्रश्न. 'किती मराठी लेखकांना मार्सेल प्रुस्त माहीत आहे?' हा सुद्धा माझ्या मनातल्या रवीन्द्रबाबांच्या असोसिएशनचा एक भाग झाला आहे.

मार्सेल प्रुस्तने ज्या सरत्या काळाबद्दल 'मेलँकलिक' होऊन लिहिलं तो काळ प्रुस्तच्या व्याकुळतेला न जुमानता पुढे निघून गेला. निघून गेलेल्या काळाकडे असहय नजरेने बघण्याशिवाय पर्याय नसतो. पण सरणारा काळ बरंच नवं काही शिकवतो. मी कोकणी साहित्याशी परिचित होऊ लागलो. ती भाषा अवगत करू लागलो. मी कोकणी बोलू लागलो, वाचू लागलो.

पाण्यात असतो तेव्हा मासा व्हायचं अन् जमिनीवर वावरताना पक्षी हे स्थलांतरितांचं आत्मज्ञान मला अवगत होतं. पाण्यात राहून माश्याशी वैर करणं जितकं बेमतलब तितकंच गोव्यात राहून कोकणीशी दुरावा करणं निरर्थक हे मला कळलं. भाषा आंदोलनात मला क्लेशकारक अनुभव आले होते. एका गटाची अस्मिता जेव्हा दुसऱ्या गटाशी टक्कर घेते तेव्हा माझ्या सारख्या परक्या माणसाच्या मनातली हिरवळ नष्ट होते. गोव्यातलं भाषा आंदोलन मी नको तितक्या जवळून बघितलं. मनावर थोडे ओरखडे उमटवून घेतले. मैत्रीपेक्षा भाषा श्रेष्ठ नाही, मैत्रीचीच भाषा श्रेष्ठ हेच मला पटतं.

स्थानिक अस्मितेच्या हलकल्लोळात मी स्वतःची व्यक्तिगत अस्मिता मात्र निग्रहपूर्वक टिकवून धरली. सगळ्या भाषांशी दोस्ती केली. पण कुठल्याही एका तंबूत आश्रय मागितला नाही. मी स्थलांतरित लेखक आहे. निर्वासित किंवा आश्रित नाही हे मला बावीस वर्षांपूर्वीच पक्कं कळून गेलं होतं. दोस्ती हे एकमेव मूल्य मानल्याने दोस्त ज्या भाषेतून लिहितात, बोलतात त्या भाषेला मी जवळ केलं. मी कोकणी वाचू लागलो. भाषा आंदोलनाचा गदारोळ सुरू असताना प्रचंड धुराळा आकाशात उडाला होता. तो जमिनीवर बसायला दहा पंधरा वर्षांचा अवधी लागला. आता हवेतली धूळ खाली बसली आहे. वातावरण बरंच स्वच्छ झालेलं दिसतं. याचं श्रेय कोकणी आणि मराठीच्या काही अनुयायांना देणं योग्यच होईल.

एक लेखक आणि वाचक म्हणून मी मराठी आणि कोकणी साहित्याच्या हृदयस्थ मध्यबिंदूपासून तर तिच्या परिघापर्यंत येरझारा घालत असतो. माझं कोकणी साहित्याचं एन्कॉऊंटर दहा वर्षांपेक्षा जुनं नाही. माझे काही मित्र कोकणी कविता करतात, नाटकं लिहितात, कथा कादंबऱ्या लिहितात म्हणून मी कोकणी वाचू लागलो. कोकणी चिनी भाषेपेक्षा बरीच सोपी असल्याने ती शिकायला फारसा वेळ लागला नाही. ज्या भाषिक पर्यावरणात मी श्वास घेतो तो श्वास अधिकाधिक सखोल असावा हा माझा आग्रह आहे.

मी कोकणी वाचतो कारण मला गोव्याच्या मनाचं स्पंदन ऐकायचं असतं. अंतिम ज्ञान ही मोठी गोष्ट आहे. मला अशा ज्ञानाची आंस नसली तरी भोवताली जे घडतं ते जर कळत नसेल तर मला चाचपडल्यासारखं होतं. गोव्याबद्दल आजपर्यंत जे इंग्रजी, मराठी आणि कोकणीमध्ये लिखाण झालं ते मला बऱ्यापैकी परिचित आहे. गोव्याच्या संस्कृतीची नाडीपरिक्षा करावी म्हणूनच मी रवीन्द्रबाब केळेकरांकडे वळलो. त्यांची काही पुस्तकं मी उत्सुकतेने वाचली. *सर्जकाची आंतरकथा* हे माझं आवडतं पुस्तक आहे. केळेकर वाचून मला जे वाटलं त्याचं एक इंप्रेशनिस्टिक चित्र या प्रसंगी काढण्याचा मोह आवरत नाही.

रवीन्द्र केळेकर हे गोव्यातले एक दुर्मिळ बिब्लिओफाईल, म्हणजे ग्रंथप्रेमी आहेत. त्यांचं वैचारिक विश्व अतिशय श्रीमंत आहे कारण त्यांचा व्यासंग आणि आकलन श्रीमंत आहे. माझ्या मते केळेकर अक्षरशः जगण्यासाठी वाचतात आणि लिहितात. त्यांची शब्दांप्रती असलेली प्रतिबद्धता अपवादात्मक आणि विस्मयकारक आहे. ही अभिजात लेखकाची लक्षणं आहेत. गोव्याच्या हिरव्या-पिवळ्या आनंदी कॅनव्हासवर रवीन्द्रबाब हे मला जांभळ्या रंगाच्या भल्या मोठ्या ढगासारखे भासतात. सोपं लिहिणं कठीण असतं. त्यासाठी रियाज लागते. केळेकरांच्या ओळींमधून ही रियाज मला ऐकू येते.

केळेकरांच्या साहित्याचं मूल्यमापन हा प्रबंधाचा विषय असून तसा एकच काय अनेक थेसिस गोव्यात लिहिले जाण्याची शक्यता आहे. केळेकरांसारखा लेखक आपल्याच तंद्रीत जगतो आणि रियाज करून लिहितो. यावर मग स्कॉलर मंडळी संशोधन वगैरे करतात. स्वतःचे काही (ठोकळेबाज) निष्कर्ष काढतात. पीएचड्या वगैरे कमावतात. रवीन्द्रबाब प्रोफेसर नाहीत तर प्रोफेसरांना कामाला जुंपणारे लेखक आहेत याची नोंद घ्यावी.

रवीन्द्र केळेकरांच्या साहित्यात मला एक मुक्त, अक्राळविक्राळ, असंघटित अशा पछाडलेल्या व्यासंगाचं दर्शन झालं. असा व्यासंग विद्यापीठीय विद्वानाला परवडणारा नसतो. केळेकर 'ॲकॅडेमिक'

लेखक किंवा विचारवंत नाहीत. त्यांची प्रतिभा विद्यापिठाच्या कोंदट केबीनमध्ये नव्हे तर समाजाच्या हमरस्त्यावर फुललेली आहे. आणि ही फार समाधानकारक बाब आहे. केळेकरांची बौद्धिक रेंज पावसाळी आकाशातल्या इंद्रधनुष्यासारखी विशाल आणि सप्तरंगी आहे. ती एकाच वेळी दुर्बिणीच्या भिंगातून रात्रीच्या निरभ्र आकाशाचा वेध घेते आणि गोव्याच्या सांस्कृतिक इतिहासाची जुळवणी करते. जागतिक आणि स्थानिक संस्कृतीच्या आपल्या कलंदर शैलीतून अन्वयार्थ लावते. अंतिम सत्याबद्दल आणि स्थानिक अस्मितेबद्दल ती एकाच वेळी प्रचंड तळमळीने बोलते.

केळेकर एकाच वेळी 'थिंकर' म्हणजे विचारवंत आणि 'पोलेमिस्ट' म्हणजे चळवळे प्रचारक आहेत. ते स्वत:ला 'रायटर' कमी अन् 'फायटर' अधिक समजतात. या अर्थाने ते आधुनिक राजकीय विचारवंत आहेत. केळेकरांना समजून घेताना 'रायटर-फायटर' हे द्वंद्व मध्यवर्ती आहे. केळेकरांच्या मूल्यव्यवस्थेत नुसता रायटर किंवा लेखक कुचकामी आहे. तो फायटर हवाच. केळेकरांचा हा आग्रह कोकणी साहित्याने आपल्यां धमन्यांमधून वाहू दिला आहे. फायटिंग म्हणजेच संघर्ष त्यांच्या पेनमध्ये शाई होऊन स्रवतो.

रवीन्द्रबाब फक्त लेखक नाहीत, तर ते 'कोकणी लेखक' आहेत. ते फक्त विचारवंत नाहीत तर 'कोकणी विचारवंत' आहेत. कोकणी लेखक हे फक्त लेखक नसतात. कोकणी अस्मितेचा क्रूस खांद्यावर वाहून नेणारे ते कार्यकर्ते असतात. या क्रुसाचं ओझं मोठ्या प्रेमाने, अभिमानाने दूर क्षितिजापर्यंत वाहून नेणं हा कोकणी अस्मितेच्या प्रकल्पाचा एककलमी कार्यक्रम आहे. तो रवीन्द्रबाबांनी मोठ्या जिद्दीने गेल्या तीस एक वर्षात राबवला आहे. म्हणूनच कोकणी अस्मितेच्या जागतिक चर्चचे केळेकर हे पोप ठरतात. किंवा प्रियोळमधल्या 'कोकणी अस्मिताय पीठा'चे ते अनाभिषिक्त शंकराचार्य ठरतात.

रवीन्द्रबाबांनी स्वभाषेची ऊर्जा ओळखली. तिची सामूहिक अभिव्यक्ती आपल्या आयुष्याचं 'मिशन स्टेटमेंट' केलं. या मिशनसाठी ते अहोरात्र तळमळले असतील, त्रस्त झाले असतील, दुखावले गेले असतील, अपमानितही झाले असतील. या साऱ्या अनुतापाच्या खुणा त्यांच्या एकूण लेखनावर अधूनमधून बोचकाऱ्यासारख्या उमटल्या आहेत. त्यांच्यातला सर्जनशील कलाकार अनपेक्षितपणे पोलेमिस्ट होतो. वाचकाला थबकल्यासारखं होतं. पण केळेकराच्या लिखाणाला सामोरे जाताना आपण 'रायटर-फायटर' या द्वंदवाचे, त्या विशिष्ट जीवनदर्शनाचे एक भाग होऊन जातो.

या 'रायटर-फायटर' द्वंदवात्मकतेच्या सीमारेषा त्यांनी जाणीवपूर्वक धूसर ठेवलेल्या दिसतात. अस्मितेची लढाई लढणाऱ्या केळेकर नावाच्या शिलेदाराची ही युद्धनीती आहे. या नीतीचं कायम भान म्हणजे केळेकरांचं समग्र वाङ्मय असं मी म्हणतो. 'कोकणी अस्मितेचं' धृपद त्यांच्या एकूण लेखनात मला वारंवार भेटतं.

केळेकरांनी कोकणी अस्मितेचा पांचजन्य फुंकला. त्याला सळसळत्या रक्ताच्या अस्वस्थ लेखक कवींनी अभुतपूर्व प्रतिसाद दिला. रणांगणाशिवाय रवीन्द्र केळेकर म्हणजे हॉटेल प्रकाशमध्ये भाजीपाव खाणारे, चहाचे घुटके घेणारे कोकणीतून चकाट्या पिटणारे




एक 'कोकणी मनीस' ठरले असते. ते तसे नाहीत हे उघडच आहे. केळेकर विशिष्ट अस्मितेचा ध्यास घेऊन प्राणपणाने लढणारे फायटर आहेत. म्हणूनच स्वत:च्या सृजनात्मक लेखकीय प्रेरणा आणि ऊर्मींना स्वत:च्या किरकोळ शरीरयष्टीत दाबून धरत त्यांनी भाषिक अस्मितेच्या शिलेदारी, युयुत्सु प्रेरणेला आपल्या लेखन आणि जीवनप्रपंचात मध्यवर्ती स्थान दिलं. त्यांचा एकूण साहित्यिक 'आऊटपुट' किंवा समग्र लिखाण याचा पुरावा आहे.

निबंध, प्रवासवर्णन, आत्मप्रवण किंवा ज्याला स्वगत म्हणता येईल असे स्फुट लेख इत्यादी माध्यमातून त्यांनी आजपर्यंत स्वत:ला अभिव्यक्त केलं आहे. कादंबरी त्यांनी लिहिल्याचं मला माहीत आहे, पण केळेकर हे कादंबरीकार, कथाकार किंवा कवी नाहीत. तसे भरघोस संकेत त्यांच्या एकूण लेखनातून मिळत नाहीत. केळेकर हे मूलत: 'नॉनफिक्शन रायटर' आहेत. वाचकांनी सुद्धा त्यांचा निबंधाचा फॉर्म मोठ्या आनंदाने स्वीकारला. रवीन्द्रबाब पुढे काय लिहितायत याची उत्सुकता त्यांच्या वाचकांना असते. त्यांचे बहुतांश वाचक त्यांचे अनुयायी आहेत. वाचक आणि अनुयायांमधला हा सूक्ष्म फरक महत्त्वाचा आहे. अनुयायी हा शिलेदाराच्या मागोमाग जाणारा फुट सोल्जर, सैनिक असतो. कोकणीसाठी केळेकरांनी टिकावू स्वरुपाची सैनिक भरती केली आहे. या सैनिकांचा प्रताप अधून मधून दिसतोच.

या ठिकाणी अधोरेखित करण्याचा मुद्दा म्हणजे केळेकर हे सृजनशील किंवा ज्याला 'क्रिएटिव' म्हणता येईल असे लेखक नाहीत.ते प्राय: वैचारिकतेचा उत्सव साजरा करणारे एक विचारयात्री

आहेत. तुलना करायची झाली तर मराठीमध्ये जे स्थान अहिताग्नी राजवाड्यांना होतं ते स्थान केळेकरांना आधुनिक कोकणीत आहे. मात्र त्यांना कोकणीचे 'ह. ना. आपटे' किंवा 'बालकवी' किंवा 'राम गणेश गडकरी' म्हणता येणार नाही. राजवाड्यांच्या लिखाणात धग आहे. तशीच केळेकरांच्या लिखाणात सुद्धा आहे. दोघांचा पिंड ऐतिहासिकतेवर आणि वैचारिकतेवर जोपासला गेला आहे. दोघांसाठी रम्यकथेपेक्षा सामाजिक वास्तव अधिक उपयुक्त मूल्य आहे.

ही मांडणी कोकणी भक्तांना कदाचित मानवणार नाही. पण एक वाचक म्हणून केळेकरांना मी असाच ओळखतो. केळेकर हे कोकणीचे नेपोलियन आहेत की डॉन क्विक्झोट? हा प्रश्न गेल्या अठरा वीस वर्षात निकालात निघाला आहे. केळेकरांनी जवळ जवळ एकहाती कोकणी अस्मितेची नव्याने व्याख्या केली. कोकणी भाषेचं पुरेसं यशस्वी राजकारण केलं. कोकणीची ऊर्जा जागवणं म्हणजे थंड लाकडातून ठिणगी निर्माण करण्यासारखं आव्हानात्मक कार्य होतं. केळेकरांनी ते पार पाडलं आहे.

लेखक लिहितो, तर शिलेदार सैन्याचं नेतृत्व करतो. लढाई नेहमीच दुसऱ्याशी असते (स्वत:शी होणारी लढाई ही आध्यात्मिक स्वरुपाची असते) कोकणी अस्मितेची 'तरंगां' हाती घेतलेले केळेकर मराठीच्या वर्तुळात अजिबात लोकप्रिय नाहीत. नव्हे, तिथे त्यांच्या वाट्याला अवहेलनाच आली आहे. त्यांच्यातल्या पोलेमिस्टावर त्यांचे विरोधक नाराज आहेत. पण एकदा संघर्षाची भूमिका घेतली की विरोध हा पवित्र धर्म ठरतो.

केळेकरांनी कोकणी अस्मितेला मराठी अस्मितेच्या विरोधात उभं केलं. कोकणीला मराठीचा पर्याय त्यांनी सपशेल नाकारला. हा त्यांचा नाकार गोव्यातल्या मराठीप्रेमींना नामंजूर असला तरी केळेकर आग्रहपूर्वक स्थानिक अस्मिता म्हणजेच कोकणी अस्मिता म्हणजेच कोकणी भाषेचे जैत हे समीकरण मांडत आले. या आग्रहात त्यांच्यातल्या फायटरचं सार्थ दर्शन होतं. ज्यांच्यासाठी फायटर लढतो त्यांच्यासाठी तो हिरो असतो, ज्यांच्या विरोधात तो लढतो त्यांच्यासाठी मात्र तो तसा नसतो. आयुष्यभर वैचारिक व्यासंग करणाऱ्या केळेकरांना हे सत्य केव्हाच उमगलेलं असावं.

व्यक्तिगत आणि स्थानिक अस्मितेची लढाई ही नेहमीच 'जय-पराजय' या द्वंदवात्मकतेच्या चष्म्यातून बघितली जाते. अशा लढ्यांचं वस्तुनिष्ठ सिंहावलोकन केलं तर त्यामध्ये भावनांचा कल्लोळ जास्त ऐकू येतो. भावना आणि विचाराचं हे शाश्वत द्वंदव सुरूच राहातं.हे द्वंदवयुद्ध लढताना केळेकरांनी स्थानिकतेला एक भावुक आयाम दिला. हा आयाम कोकणी चळवळीच्या हृदयाची 'लब-डब' म्हणजे 'धडकन' आहे.

स्थानिक मराठी अस्मितेचा युक्तिवाद नाकारून त्यांनी कोंकणी अस्मितेच्या युक्तिवादाला उठाव दिला. त्यांचा हा ध्यास मराठीच्या चष्म्यातून एकांगी भासत असला तरी कोकणीच्या चष्म्यातून बघितल्यास तो एक सांस्कृतिक पराक्रम ठरण्याचीच शक्यता आहे.

अशा या पराक्रमी शिलेदाराच्या व्यासंगाला एक वाचक म्हणून मी दाद देतो. कोकणीत अल्पाक्षरी शैलीला, नियोजनबद्ध वाक्य रचनेला, वाक्यांच्या ऱ्हिदमला, नादाला, प्रगल्भ व्यासंगाच्या सुलभ शैलीदार मांडणीला अधोरेखित करणारी केळेकरांची लेखणी मला आवडते. केळेकरांचा जागतिक वाङ्मयाचा व्यासंग, त्यावरची त्यांची स्वत:ची खास व्यक्तिविशिष्ट निरीक्षणे वाचताना मी सुखावतो. त्यांच्या अल्पाक्षरी निबंधांतून मला अनपेक्षित खजिने गवसले आहेत.



कोकणीची सळसळ, अस्वस्थपण आणि शल्य त्यांनी उजागर केलं. व्यक्तिगत आर्तामधून त्यांनी एका समाजाचं आर्त जागवण्याचे अथक प्रयत्न केलेत. त्यांचं जीवन सार्थकी लागल्याची चाहूल त्यांच्या लेखनातून अधून मधून येते. मित्र दिलीप बोरकर याने रवीन्द्र केळेकरांचं एक पोर्ट्रेट चितारलं. *श्रेयार्थी* हे त्या चरित्राचं नाव. तिथे भेटणारे रवीन्द्रबाब मला बावीस वर्षांपूर्वी भेटलेल्या रवीन्द्रबाबांचीच प्रतिकृती वाटतात. एक मनस्वी, तिखट जीभेचा, मानी, व्यासंगी, मिश्कील आणि श्रेयसाचा पाठलाग करणारा हा चिरतरुण विचारवंत आधुनिक कोकणीचा फिल्डमार्शल आहे हे केळेकरांच्या रणांगणावर विरुद्ध दिशेला उभे असलेले सगळे सैनिक मान्य करतात.

शेवटी सगळ्याच लढाया याच सीमित जीवनात पार पाडायच्या असतात. त्या लढताना एका प्रकारची माणसं फक्त तलवारींचा खणखणाट करतात. तर दुसऱ्या प्रकारची माणसं तो करताना आपल्याच तंद्रीत गात असतात. चुटक्या वाजवून जीवनाची मजा लुटत असतात. चौफेर बघून सौंदर्याला दाद देत असतात. जीवनातल्या हिणकसाला नाकारत असतात, भांडत असतात, प्रेम करत असतात, रागावत असतात, लोभ करत असतात. रवीन्द्र केळेकर हा दुसऱ्या प्रकारचा माणूस आहे.

स्वत:ची वैचारिक व भावुक ऊर्जा त्यांनी इतरांमध्ये वाटून टाकली. अशा दानशूर माणसाच्या जीवनात सार्थकतेचं रोप उगवतं. भारतातल्या अत्युच्च साहित्यिक संस्थेने, साहित्य अकादमीने, रवीन्द्रबाबांना फेलोशिप देऊन जो गौरव केला तो एका सळसळत्या, विचारप्रवण जीवनाचा गौरव आहे. रवीन्द्रबाबांच्या पुढील अर्थपूर्ण जीवनाला माझ्या मन:पूर्वक शुभेच्छा.

# कोंकणीचा महासाहित्यिक

♦ शैला राव



छोट्या रवीन्द्राच्या हातून एकदा थर्मामीटर फुटला ते त्याने घाबरून लपवले होते. डॉक्टर वडिलांच्या लक्षात आल्यावर त्याला तंबी ऐवजी सल्ला मिळाला, 'तू कोणाला घाबरू नकोस आणि खोटं बोलू नकोस' हा मंत्र आयुष्यभर त्यांना मार्गदर्शन करीत आला. काका कालेलकरांच्यामुळे कोऽअहं?चे उत्तर शोधणाऱ्या रवीन्द्रबाबांना त्यांच्या आयुष्यातले 'मिशन' सापडले. राममनोहर लोहियांच्या भाषणामुळे सशस्त्र क्रांती तीही 'आज-आत्ता'ची निकड भासू लागली...

गोव्याबाहेरच्या लोकांना गोव्याबद्दल अनेक कारणांमुळे कुतूहल वाटत असते. पर्यटन, राजकारण (टिवल्याबावल्यांचे तरीही सर्वेक्षणात अव्वल) मिश्र संस्कृती या सर्व बाबीं विषयीच्या कुतूहलाचे समाधान होत असेलही पण आज तीन दशकांच्या वास्तव्यानंतर असे वाटते की गोव्याचे अंतरंग गोव्याबाहेरच्या लोकांना कळलेले नाही म्हणून गोव्याचे अंतरंग उलगडून दाखवण्याच्या सदिच्छेने गोव्यातील काही व्यक्तींचा परिचय करून देत आहे. या लेखमालेत न आलेल्या व्यक्ती कमी महत्त्वाच्या आहेत असे नाही. उलट त्यांच्यापर्यंत मी पोहोचू शकले नाही, हे माझे दुर्दैव.

पहिली व्यक्ती निवडली आहे ती श्री. रवीन्द्र केळेकर. इथल्या पद्धतीप्रमाणे रवीन्द्रबाब असा त्यांचा उल्लेख करते. रवीन्द्रबाब ही व्यक्ती आपल्या देशाच्या स्वातंत्र्यलढ्याचा साक्षीदार आणि गोवामुक्ती संग्रमातील आघाडीचा सैनिक या दोन्ही दृष्टीने माझ्यासमोर आल्यावर मला मोठे कुतूहल वाटते. कोकणी भाषेच्या उदरगतीसाठी (भरभराट) लेखणी पणाला लावून झुंजणारे रवीन्द्रबाब आज ऐंशीच्या उंबरठ्यावर उभे

आहेत. आपल्या 'मिशन'च्या बाबतीत तृप्त आहेत. स्थानिक वर्तमानपत्र दैनिक 'नवप्रभा' मधील 'स्वगत' ही लेखमाला आज कित्येक वर्षे ते लिहीत आहे. कोंकणीचा 'झुजारी' (लढवय्या) मराठीतून सातत्याने लिहितो. झोपेचे सोंग घेणाऱ्या सुशेगादांची (ऐदी) कुरापत काढतो तेव्हा त्यांना प्रत्यक्ष भेटावं, समजून घ्यावं म्हणून दोन कामं केली. त्यांना भेटले, त्यांच्याशी बोलले आणि त्यांचे कोकणी, मराठी साहित्यही वाचून काढले. गप्पा मारीत असताना आणि साहित्य वाचत असताना प्रकर्षानं जाणवलं की या माणसाचं जीवन आणि लिखाण पारदर्शक आहे. कोणतीही भूमिका त्यांना वठवायची नाही, कसला आव त्यांना आणायचा नाही. हातचं राखून काही लिहायचं नाही.

स्वातंत्र्यसैनिक आणि साहित्यिक रवीन्द्रबाब यातील त्यांची साहित्यिक प्रतिभा मला जास्त भावली. त्यांची एकूण ४० पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. पैकी दोन मराठी आणि राहिलेली कोकणीत. 'स्वगत' लेखमाला पुस्तकरुपात बंदिस्त झाली तर मराठीतलं त्यांचं तिसरं पुस्तक होईल. कोकणीतली त्यांची पाच एक पुस्तके भाषांतरित असून इतर सगळी त्यांची स्वत:ची आहेत. जपान जसा दिसला (प्रवासवर्णन) आणि ज्ञाननिधीच्या सान्निध्यात (काकासाहेब कालेलकरांशी केलेले हितगुज-वासरी-डायरीरुपाने) ही दोन पुस्तके मराठीत आहेत. १९७६-७७ च्या सुमारास महाराष्ट्रांतल्या युवक भारती या मराठीच्या पाठ्यपुस्तकात जपान जसा दिसला या प्रवासवर्णनातील काही भाग अंतर्भूत केला होता.

कोंकणीतील अडतीस पुस्तकांपैकी *पांथस्थ* (गोवामुक्ती संग्राम) *सर्जकाची आंतरकथा* (साहित्यसेवेत हाती लागलेले सत्य) *घुसपल्लें जानवें* (गुंता झालेले जानवे-ललित वैचारिक लेख) *एका विचाराची जिवीत कथा.* (म. गांधींचे जीवन) *महाभारत-एक अनुसर्जन* १ ला, २ रा भाग (महाभारत-कोकणीत रुपांतरित) *वेळे वयल्यो घुलो* (किनाऱ्यावरील शिंपल्या-रोजनिशी) *ब्रह्मांडांतलें तांडव* (नक्षत्रविद्या) *समिधा* (जीविताचे काही आयाम) ही खास उल्लेखनीय आहेत.

छोट्या रवीन्द्राच्या हातून एकदा थर्मामीटर फुटला ते त्याने घाबरून लपवले होते. डॉक्टर वडिलांच्या लक्षात आल्यावर त्याला तंबी ऐवजी सल्ला मिळाला, 'तू कोणाला घाबरू नकोस आणि खोटं बोलू नकोस' हा मंत्र आयुष्यभर त्यांना मार्गदर्शन करीत आला. काका कालेलकरांच्यामुळे *कोऽअहं?*चे उत्तर शोधणाऱ्या रवीन्द्रबाबांना त्यांच्या आयुष्यातले 'मिशन' सापडले. राममनोहर लोहियांच्या भाषणामुळे सशस्त्र क्रांती तीही 'आज-आत्ता'ची निकड भासू लागली. महात्मा गांधी आणि साबरमती आश्रमवासीयानी अ-लक्षिलेल्या सगळ्याच बाबींच्या तळापर्यंत जाण्याची सवय लावली. विवेकानंदांच्या लिखाणाने तर इकडचा हिमालय तिकडे भिरकावून देण्याची स्फूर्ती मनात जागवली. रवीन्द्रनाथ टागोरांचे साहित्य आणि शांतिनिकेतनातील वास्तव्याने 'तुझे आहे तुजपाशी'चा साक्षात्कार घडवला. लहानपण दीव येथे गेल्यामुळे आणि साहित्याच्या स्वाभाविक गोडीमुळे गुजराती, मराठी, हिंदी, इंग्रजी साहित्याचे भरपूर वाचन झाले. पोर्तुगीजांची गोवा कर्मभूमी झाल्याने पोर्तुगीज भाषाही आत्मसात केली. या सगळ्या प्रभावातूनच त्यांना नवा गोवा घडविण्याची प्रेरणा मिळाली. त्यांच्या साहित्यिक पिंडाची 'पोसवण' या बहुभाषांमुळे झाली.

मन रिझवणे हा साहित्याचा हेतू असे रवीन्द्रबाबांनी कधीच मानले नाही. जीवन घडवणे हे साहित्याचे कार्य अशी त्यांची निष्ठा आहे. उपासना जीवनाची करायला हवी आणि साहित्य हे त्या जीवनाची उपासना करताना मिळालेले उपफळ (बाय प्रॉडक्ट) आहे असं ते मानतात. म्हणूनच त्यांनी त्यांच्यातल्या कलाकाराला त्यांच्यातल्या साहित्यकाराचा मालक होऊ दिला नाही, सेवक म्हणूनच मानला. या दृष्टिकोनातूनच त्यांनी गेली साडेचार दशके साहित्यनिर्मितीचे अग्निहोत्र चालू ठेवले आहे. पण हा त्यांचा निष्काम कर्मयोग नाही. 'प्रस्थापिता विरुद्ध भांडण करणे हा त्यांचा धंदा' अशी मित्रांनी ओळख करून दिलेली असली तरी 'मी स्वत: चिंतन करतो आनी दुसऱ्यांना चिंतन करायला लावतो असं ते म्हणतात व याची सत्यता त्यांचे साहित्य वाचल्यावर पटते.

शहरीकरण, हिंदुत्व, धर्मांतरे, इंग्रजीचे वर्चस्व, कायद्यापेक्षा प्रबोधानाचा मार्ग, मुक्त बाजार-बाजार मुक्ती, विश्वशांती, अमेरिकेचे अर्थतंत्र, मराठी वाचनसंस्कृती ढासळत चालली आहे?, कोठे गेल्या चिमण्या?, आंधळा अभिमान, शब्दांचे अर्थ, विकास कुठल्या दिशेने?, विरोधकांचाही मान राखावा, नोबेल इनाम, मुलांसाठी गोष्टी, पुस्तक प्रकाशन आणि विक्री इत्यादी अनेक विषयांवर अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने त्यांनी लेख लिहिले आहेत.

रवीन्द्रबाब गंभीर-वैचारिक लेखांची देखील हलक्या-फुलक्या घटनांनी, निमित्ताने सुरुवात करतात. 'अ-सरकारी नेतृत्वच लोकशाही असरकारी करू शकेल!' याच्या सुरुवातीला त्यांनी चीनचा राजा च कोन्फुत्सु याची गोष्ट सांगून राज्याचा व राजाचा फायदा यातला फरक विशद करीत बिनसरकारी नेतृत्व कसा परिणाम साधू शकते हे सांगितले आहे. 'गेल्या कोठे सगळ्या चिमण्या?' या पर्यावरण प्रदुषणावरील लेखाची सुरुवात नातवाला गोष्ट कशी सांगत होतो आणि नातवाने निरुत्तर कसे केले? अशी केली आहे.

कोणत्याही विषयावर लिहिताना, विषयाचा सखोल विचार केल्याशिवाय ते लिहित नाहीत. 'मराठी माणसांची वाचनसंस्कृती-खरीच ढासळली आहे काय?' यात त्यांनी लोकप्रिय पुस्तकांच्या आवृत्त्यांची जी आकडेवारी दिली आहे ती त्या त्या पुस्तकांच्या प्रकाशकाखेरीज सर्वसामान्य वाचकाला कधीच माहिती नसेल. मग हे ढासळणं हा कांगावा आहे का? इतर सबबी कश्या लंगड्या आहेत, खरं काय आहे? ही खरोखरच चिंतन करायला लावणारी गोष्ट आहे. पण या निष्कर्षाला ते कसे सहज पोचतात!

रवीन्द्रबाबांना रेशमी चिमटे घेत, लक्ष्यार्थाने लिहिणे आवडत नाही. त्यांना अत्यंत व्यथित करणारे विषय म्हणजे ब्राह्मणांची नादीरशाही, हिंदुत्व, पोखरलेलं राजकारण, शहरीकरण, नेहरूंची धोरणी वृत्ती, वगैरेंवर लिहू लागले की उघडपणे आणि नि:संदिग्धपणे लिहितात. घटना, नावे, तारखा, सर्वांचा तपशील देत सरळ वार करतात. बेधडकपणे अर्जुनाला 'ढ' म्हणतात. आणि ज्ञानेश्वरांना वैफल्यग्रस्त म्हणतात. 'अब्राह्मणम्' म्हणून कोणी त्यांना मूर्खात काढू दे. त्यांना पर्वा नाही. कारण त्यांच्याजवळ तर्कसंगत खुलासा आहे. अलिकडे गोमंतकात अनेक सत्पुरुषांनी लोकांना मन:शांतीचे



तरणाटो रवीन्द्र दीवाक कुटुंबा वांगडा...

पाठ दिले हे ऐकून रवीन्द्रबाब म्हणतात, "आधीच भोळ्या समजुतीत अडकलेला गोमंतकीय इंग्रजीतून मिळणाऱ्या या पंचतारांकित माहितीमुळे मनोरुग्णासारखा वागतो. अध्यात्मिक उन्नतीला नितांत आवश्यक असलेली अंतर्मुख वृत्ती, विवेकबुद्धी सोडून नामस्मरणा वगैरेंचा काम्पोझ -सारखा वापर करतो. ही उच्च विचारसरणी नाना प्रकारच्या भ्रमात पाडते. आपलं अध्यात्मिक ध्येय मनुष्यत्व गाठणे हेच असायला हवं."

धर्मांतरावर कायद्याने बंदी आणण्याचा विचार आज आसमंतात भरून आहे. त्यावर रवीन्द्रबाबांचं म्हणणं काय? त्यांनी कशी गुगली टाकली आहे पाहा. 'हा सेक्युलर देश असून सर्व धर्म सारखेच मानणारा आहे. अशा देशात एकापेक्षा दुसरा धर्म चांगला म्हणून धर्मांतर केले असे म्हणणे घटनाविरोधी आहे'. बरं. आणखी लोकप्रिय विचार म्हणजे आखाती देशातून पेट्रो डॉलर आणून इथले त्यांचे प्रतिनिधी लोकांना मुसलमान करतात. लोकांना म्हणजे कोणत्या लोकांना? ख्रिस्ती लोकांना? मग हिंदूच का त्यांच्या तावडीत सापडतो? बरं किती मिशनरींनी मुसलमानांना ख्रिस्ती बनवले आहे. भारतातला बहुतेक आदिवासी भाग ख्रिस्ती का बनलाय याचं उत्तर काय? तर हिंदू बनवता येत नाही, तो जन्मावा लागतो! म्हणजे बॅट बॉलला न लागता हवेतच फिरली म्हणायची! मिशनऱ्यांच्या मते ज्यांना धर्मच नव्हता त्यांना मिशनऱ्यांनी धर्म दिला. हा बचाव असेल. पण अशांना धर्म द्यायला हिंदुंना कोणी अडवले होते का? शिवाय हिंदू धर्म दिल्यानंतर त्यांना कोणत्या जातीत घालायचे? विसाव्या शतकातल्या दुसऱ्या दशकात ख्रिस्ती बनलेल्या गावड्यांचे शुद्धिकरण करून त्यांना हिंदू समाजात आणले होते. पण आजदेखील त्यांना 'किरिस्तांव गावडे' म्हटलं जातं आणि अजूनही मूळ गावडे व नवहिंदू गावडे यांच्यात बेटीव्यवहार होत नाही.

दलितांचे बौद्ध धर्म स्वीकारणे! बौद्ध धर्म प्रस्थापित हिंदू धर्माचे विद्रोही रुप आहे. म्हणून तो ख्रिस्ती किंवा इस्लामी धर्मासारखा 'दुसरा' धर्म होत नाही. त्यामुळे आज दलितांनी जो धर्म स्वीकारला त्याला विद्रोह म्हणावे, धर्मांतर नव्हे. त्यांच्या या विद्रोहात कित्येक क्रांतीकारी भावना दडल्या आहेत त्या संपूर्ण भारताला नवी दिशा देणाऱ्या आहेत. जो पर्यंत भटब्राह्मणांची मक्तेदारी आणि दादागिरी संपुष्टात येत नाही तोपर्यंत हा विद्रोह टाळता येणार नाही" असे ठणकावून सांगणारे रवीन्द्रबाब, ज्योतिषी किंवा समाजशास्त्रज्ञ नाहीत. समाजमनाचा अभ्यास केलेला, ठाव घेतलेला, काळाची पावलं वेळीच ओळखणारा हा साधा माणूस आहे.

रवीन्द्रबाब यांचे रविवार नवप्रभेतील 'स्वगत' नियमितपणे वाचणाऱ्या वाचकांनी 'केळेकरांना हिंदू धर्मातील दोष दिसतात. त्यांनी अन्य धर्मीयांचेही दोष दाखवावे' असे मत व्यक्त केल्यावर मी त्यांचे मत विचारले असता ते म्हणतात, "दुसऱ्या धर्मातील दोष दाखवण्याएवढा अभ्यासाने येणारा अधिकार हवा हे एक. दुसरे माझा धर्म स्वच्छ, निर्दोष आहे हे मला परधर्मीयांना पटवून देण्याचा नैतिक अधिकार मला हवा!" तो सोनियाचा दिवस उजाडावा म्हणूनच केळेकर हिंदूधर्मातील तण-काटे, मुळांसकट उपटायला बघताहेत.

रवीन्द्रबाबांच्या स्वगतच्या शेजारच्या लेखात 'प्रकट स्वगतातील मुद्दे आरोप मान्य करून काही विधायक सूचनाही जोडल्या आहेत. तसेच पं. नेहरूंच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाबद्दल साशंकता व्यक्त करणाऱ्या लेखाला उत्तर म्हणून धावे सत्तरी या गोव्यातील एका तालुक्यातील माजी आमदार श्री. जयसिंगराव राणे यांनी नवप्रभामध्येच 'पं. नेहरूंवरील टीका अर्थहीन' या आशयाचा लेख लिहिला आहे.

जयसिंगराव राणे स्वतः भारताचे स्वातंत्र्य सैनिक असल्यामुळे त्यांनी या टिकेची दुसरी बाजू दाखवली आहे. तिला प्रत्यक्ष अनुभवाचा भक्कम पाया आहे. त्या तरफदारीत काही मननीय मुद्दे आहेत. मला समाधान वाटले. एवढ्याचसाठी की गोव्याचे लोक आता सुशेगाद राहिले नाहीत. चिंतन करतात, प्रतिवाद करतात. आता त्यांना कोणी गृहित धरू शकत नाही हे अभिनंदनीय आहे.

रवीन्द्रबाबांची सर्जनशीलता पाहायची असेल तर त्यांचे *सर्जकाची आंतरकथा* व *महाभारत-एक अनुसर्जन* या पुस्तकांकडे वळावं लागेल 'मला जे वाटतं ते तुम्हालाही वाटत असेल. नसेल तर याचा अर्थ तुमच्या अकलेवर कोळीष्टकं जमली आहेत. ती काढून टाकली की तुम्हालाही माझ्यासारखंच वाटू लागेल. दुसऱ्यांच्या बुद्धीवर विश्वास ठेवणे जर अचूक असेल तर ती चूक मी जाणुनबुजून करतो आहे आणि मला जे सांगायचं आहे ते सांगतच राहाणार आहे.' हे आंतरकथेतील आंतरकथेत लिहिलेले मनोगतच त्यांच्या लेखनाची प्रेरणा आहे. (रवीन्द्रबाब कसे वकिली डावपेच खेळतात पाहा. अहो, कोणता वाचक फुकटात मिळालेलं आपल्या बुद्धीचं प्रमाणपत्र घेणार नाही?) 'शहाणे करून सोडते सकलजन' यात जरा बदल करून लोकांना शहाणे करण्याऐवजी माझ्यासारखे वेडे करण्यासाठी खपलो, असं जेव्हा रवीन्द्रबाब म्हणतात तेव्हा वेडं झाल्याशिवाय, झपाटल्याशिवाय ईप्सित गाठता येत नाही, हे पुन्हा एकदा पटतं.

आंतरकथेत लेखक का लिहितो, त्याने साधना किती आणि कशी करायला हवी, त्याचे खाद्य काय, प्रवास अनुभवसंपन्नता कशी देतो, स्वाध्याय, करणाऱ्याने आळस करता कामा नये, महाभारत ग्रंथाने त्यांच्यावर पाडलेली छाप, साहित्यातील प्रगतीशीलता आणि पलायनवाद, साहित्यात नैतिक दृष्टिकोन, पत्रकारिता हे एक व्रत असते इत्यादी विषयांचा परामर्श घेतला आहे.

रवीन्द्रबाब म्हटलं, मागं वळून पाहताना काय खंत? त्यांची पुस्तकं वाचायला बाबा राहिले नाहीत याची खंत त्यांना वाटते. म्हटलं, 'तुमच्या स्वतःच्या लेखनाबद्दल तुम्हाला काय वाटतं?' 'कोकणीचा इतिहास कधी काळी लिहिला तर कोकणी गद्याच्या पायथ्याचा दगड, एवढं त्यांच्याबद्दल लिहितील एवढा त्यांना आत्मविश्वास वाटतो.

पुढे म्हणतात, ''खूप लिहिलं आता थांबलेलं बरं, वाचायचं खूप शिल्लक राहिलंय्' असं त्यांच्यातला फायटर म्हणतो, 'नाही, The best is yet to come.' केळेकरांना स्वतःला 'निबंध हा त्यांना जमलेला फॉर्म वाटतो. काय सांगितले याच्याऐवजी कसे सांगितले याच्याकडे जर लक्ष वेधले तर निबंध 'फेल' झाला असं त्यांचं म्हणणं ('फेल' होणं म्हणजे 'व्यर्थ' हा खास गोमंतकीय लोकमानसातील अर्थ) या त्यांच्या निकषावर त्यांचे सगळे वैचारिक लेख 'पास' झाले एवढेच नव्हे तर विशेष श्रेणीत पास झाले आहेत.

'साहित्याने तुम्हाला काय दिलं?' यावर त्यांचं उत्तर आहे. आंतरिक जीवन गिरेस्त (समृद्ध) केलं. लिहिणं श्वास घेण्याएवढं सहज व आवश्यक असायला हवं या कसोटीला आपलं लिखाण उतरायचं आहे असं जेव्हा ते म्हणतात तेव्हा ते अत्यंत 'नमळायेन' (नम्रतेने) म्हणतात असं वाटतं (ता. क. मराठीने 'नमळाय' शब्द आत्मसात करावा कारण 'नम्रता' चा उच्चार त्यातील भाव समाधानकारकपणे व्यक्त करत नाही.) *ब्रह्मांडांतले तांडव* या नक्षत्रविद्येवरच्या पुस्तकावरचा बा. भ. बोरकरांचा अभिप्राय काय आहे?' हे निव्वळ काव्य नव्हे तर एक महाकाव्यच तुम्ही कोकणीला दिले आहे. रवीन्द्रबाब, उगीच का या अभिप्रायाने तुम्हाला नोबेल पारितोषिकापेक्षा जास्त आनंद दिला?

*महाभारत-एक अनुसर्जन*. या महाभारताच्या दोन खंडांनी रवीन्द्रबाबांना निर्भेळ आनंद दिला. ते म्हणतात, 'लोकप्रिय कथाच कोकणीत आणायला तसे वर्ष-दीड वर्ष पुरले असते परंतु स्वतः व्यासांना कोकणीत पुनर्निर्मिती करायची झाल्यास त्यांनी कशी केली असती, तशी करायचा प्रयत्न केला आहे. इथे त्यांच्याशी बरोबरी करण्याचा प्रयत्न नाही पण केवळ भाषांतर म्हणून न पाहता व्यासांच्या प्रतिभेचा ठाव घेण्याचा प्रयत्न केला आहे. रवीन्द्रबाबांच्या मते त्यांच्या जीवनातला सर्वात मोठा सृजनशीलतेचा हा काळ होता. महाभारताची पुनर्निर्मिती केल्यानंतर रवीन्द्रबाब पूर्वीचेच राहिले नव्हते. ते संपूर्णपणे नव्याने जन्माला आले होते. या जन्मोत्सवात त्यांच्या सहधर्मचारिणीचा गोदूबायचा बरोबरीचा वाटा आहे. सतत सहा वर्षे या पुस्तकांचे लेखन त्या करत होत्या, न कंटाळता न थकता. (आज पंचावन्न वर्षांच्या वैवाहिक सहजीवनात मुलगा सून-नाती-आला गेला या सर्वांचं मनापासून करीत सहधर्मचारिणीची भूमिका समर्थपणे वठवीत आल्या आहेत.)

पोर्तुगीजांनी गोव्याचे खूप नुकसान केलेले असले तरी पोर्तुगीज साहित्यावर रवीन्द्रबाबांचं फार प्रेम आहे. म्हणून त्या भाषेतील फ़ेर्नान्दु पेस्सोआची कविता मुळातून वाचून समजून घेण्यासाठी तरी गोव्यात पोर्तुगीज भाषा टिकवून ठेवायला हवी असं त्यांचं म्हणणं. उमाशंकर जोशी हे गुजराथी कवी केळेकरांचे आश्रमबंधू होते. माणूस आणि कवी म्हणूनही केळेकरांना फार आवडलेले उमाशंकरांच्या पन्नास वर्षांच्या साहित्यसेवेकडे पाहिल्यास गुजराथीतून लिहून ते भारतीय कवीच्या दर्जावर पोहोचले याचं केळेकरांना कोण समाधान आहे! भाषेला थोरवी मिळवून देण्यासाठी जे जे करायला हवं ते ते करावं. हीच भाषेची खरी सेवा! हा मंत्र रवीन्द्रबाब उमाशंकर जोशींकडून शिकले. रवीन्द्रबाब केळेकरांच्या सगळ्या प्रकारच्या साहित्यातून रवीन्द्रबाब एक व्यक्ती म्हणून मला भेटली. गोव्याबाहेरच्या मराठी वाचकालाही ते भेटावेत या प्रामाणिक इच्छेला आंतरभारतीसारख्या संस्थेने मूर्त रूप दिल्यास एका जातीवंत सर्जकाला नाकारलेला मान दिल्याचं श्रेय संस्थेला मिळेल.

आपल्या मातृभाषेला दुबळी म्हणून डिवचले. म्हणून तिला सबल करून दाखवायच्या एकाच ध्यासाने सतत पंचेचाळीस वर्षे अत्यंत तळमळीने कसदार साहित्य निर्माण करण्याचे अग्निहोत्र चालवणारे रवीन्द्रबाब आज तृप्त आहेत. त्यांनी पेटवलेली कोकणीची मशाल तरूण सळसळतं रक्त हातात घेऊन घौडदौड करत आहे. मराठी माणसानं त्यांना मनापासून शुभस्तु पंथानम् म्हणावं.

*(हो लेख, मार्च २००४ च्या 'किर्लोस्कर' नेमाळ्यांत उजवाडा आयिल्लो.)*

# MAN WHO GOT KONKANI ITS PLACE OF PRIDE



♦ Chandrakant Keni

It was in the company of Dr Lohia that Kelekar was able to see for himself the potential of people's language in stirring the passive populace into action. He could then see the potential of Konkani realized. Towards that goal was targeted the mission of his life,

Among the few visionaries of the Konkani world of this millennium who have incessantly endeavoured for an all-around development of Konkani, is Ravindra Rajaram Kelekar. Blessed with a creative genius of rare acumen and an equally unwavering dedication to the Konkani Movement, he yoked the two imaginatively to the cause of Konkani. With his lucid, high-quality prose in Konkani, he helped elevate the language to the level of other leading languages of India and found her a place in the fraternity of world languages. A crusader in the genuine sense of the term, Kelekar took off from where the great pioneering pilgrim of modern Konkani Movement, the late Shennoi Goembab had laid down the reins of the movement. Kelekar's versatile contribution in the literary field alone is such that had he confined himself to literary activity alone he would have still managed to carve an enduring niche for himself in the realm of Konkani letters.

Convinced fairly early in life that Konkani would not be in a position to assert her legitimate status as the language of Goa as long as Goa remained under the Portuguese imperialism, young Ravindra did not wait even to complete his education. While still at the Lyceum, he plunged into the struggle for Goa's liberation in 1946. Perhaps the atmosphere in house was conducive to his independent thinking and his zeal for freedom. His father Dr. Rajaram Kelekar, himself an erudite physician, was keenly interested in scholarly pursuits. Steeped in national culture, he had the rare distinction of having translated the *Bhagwat Geeta* into Portuguese. Perhaps the seeds of erudition and nationalistic fervour were imbibed by son from his father.

However, young Ravindra's zealous reading was in all probability equally instrumental in guiding his footsteps towards the right path. At 21, he had already devoured, albeit with some skepticism, the Gandhian thought ! He was fortunate at this juncture to be associated with the pro-active thinker and socialist leader Dr Ram Manohar Lohia. He found Dr Lohia articulating similar ideas. Thus this association turned out to be truly a turning point in the life of Kelekar. It steered the entire course of his life into a new direction.

A new crusader was shaped, who was ostensibly linked to the Goan freedom struggle, no doubt, but more important to the cause of Konkani in the long run. It was in the company of Dr Lohia that Kelekar was able to see for himself the potential of people's language in stirring the passive populace into action. He could then see the potential of Konkani realized. Towards that goal was targeted the mission of his life, but not before his sojourn at the Gandhian ashram at Wardha.

Frustrated by the state of affairs of the Goan freedom struggle in the years succeeding Dr Lohia's charismatic awakening of the Goan nationalism and disturbed by the dilemma over the nature of that struggle, Kelekar left for Wardha in 1949 where he met Kakasaheb Kalelkar. An instinctive chord was struck in the very first meeting of the *guru-shishya* twain. The saintly Kakasaheb invited Ravindra to come and live with him. And the latter promptly made his home with the great Gandhian.

This was to be an extremely regenerative and life long relationship. Kelekar continued to live and grow in the hallowed presence of his Guru until Kakasaheb's demise, imbibing from the great visionary, inspiration and guidance to last a life time. His stay at Wardha concluded when he was appointed librarian of Gandhi Memorial Museum, New Delhi in 1955. This was a windfall and Kelekar willingly accepted this unique opportunity to live and grow in the company of books he so loved!

Here began his diligent *sadhana* of knowledge which continues uninterrupted to date. This exposure to the vastness of human knowledge made him acutely aware of individual limitations and instilled the sense of humility so essential to the devotee of knowledge. Yet, despite these beautiful experiences in personal life, Kelekar was not really happy in Delhi. His heart wept at the thought of his native Goa, doomed still to be in the bondage of Portuguese imperialism long after the rest of India had gained her independence from the British rule. In 1956 he was to plunge back into active freedom struggle for Goa. Somehow he was not happy with its progress.

Even while at Wardha, he had always been preoccupied with the thought of Goa, dreaming of her liberation and peddling his dreams for her future through the fortnightly *'Mirg'* (Wardha, 1949-54). The response he received was very heartening. Yet he was to notice that the sizeable number of Goans had been denationalized as a result of the unfortunate strategy of the Portuguese. He was quick to notice that unless this vast section of Goans was brought back to the main stream, the internal strength of Goans as a cohesive people could neither be evoked nor utilized.

And so, Kelekar set his shoulder to the wheel and directed his energy to the unity and integration of Goans as the first step towards the achievements of other allied goals such as freedom of Goa, the invocation of dignity, and above all, the resurgence of Konkani as a natural expression of that identity. The result was the weekly periodical 'Gomant Bharati' (1956-60) in Roman script aimed at popular awakening which he undertook to edit from Bombay. Its readership was Goan diaspora in an outside India. Gradually the spark of self respect and nationalism began to kindle in the hearts of Goans across the world.

But even such well-directed campaign for Goa could not for long contain Kelekar's urge to return to his native soil and participate in active agitation. Accordingly, he arrived in Goa in 1951 but was soon imprisoned by the Portuguese authorities in June of the same year. However, he was blessed to see the dawn of Goa's liberation on December 19, 1961 from the Goan soil. Goa's freedom marked the realization of the first of the many dreams he had dreamt for his land. He looked forward to the fulfillment of the others with natural opportunism that with this main hurdle overcome the rest would follow as a due sequel of events. That was not to be...!

The tragic irony was that Konkani's position was hardly elevated or even sought to be consolidated in liberated Goa. On the contrary she was dragged into unsavory and uncalled for controversy challenging her



'सन्निधी', दिल्लींत काकासायबांचो 'घराबो'...

very status as a language. The result was, a long drawn struggle for Konkani became necessary. Kelekar willingly took over the stewardship of this mass movement and led it to its logical culmination which came with the Sahitya Akademi recognition of Konkani as an independent literary language of India. It is noteworthy that Kelekar is among the main architects of Konkani's position as a major literary language of India.

However, despite this early victory of Konkani, her status in Goa still remained bleak. Konkani was not granted her legitimate place of pride as the official language of Goa. Another unyielding agitation was therefore launched to demand the status of official language for Konkani. Kelekar chose to be the inspiring spirit behind this agitation making way for the youthful enthusiasts of Konkani to assume leadership. What followed was full-fledged statehood for Goa in the Indian Union. This had been Kelekar's long-nursed ambition for Goa, yet, as things stood, it was not enough.

Unless Konkani was legitimately strengthened as the state language of Goa and proclaimed among the major languages of the Indian union, the very soul would be lost. So would the identity of Goa be endangered in not too distant a future. Kelekar read the writing on the wall and left no stone unturned to convince all those who matter regarding the rightful demands of Konkani right from the government of India down to his fellow-members representing the various languages on the Sahitya Akademi.

He was so taken up with the cause of Konkani that even at the book release function of his transcreation of *Mahabharata* at the hands of the then Prime Minister, Rajiv Gandhi, Kelekar took time off his five minute speech to present in a nut shell the case of Konkani before the learned gathering. His tireless efforts paid dividends in 1992 when Konkani was included in the Eighth Schedule of the Indian Constution. But this mission over, Kelekar did not linger on the political platform to nurse personal ambitions.

He quit the scene immediately to retire to his modest calling as a man of letters devoting his time fully to what he has always loved the most—reading, writing, contemplation. Even a cursory glance at the bulk of his writing will indicate the sheer range of Kelekar's work. Moreover, their publication dates will show how the man was active with his pen even at the height of the agitation he led as a part of the Konkani movement. His writing



फोटो: मनोहरराय सरदेसाय

राम मनोहर लोहियां वांगडा...

is multi-generic and included such diverse works as literary prose, novella, allegorical short fiction, travelogue, diary-writing, astronomical writing, socio-linguistic discourse, conversations, memoirs, autobiography and biographies, polemical writing, intellectual essays and so on.

His output on the area of translation work is also highly impressive, considering not only the bulk of the translated oeuvre but the felicity with which he has translated from and into Konkani, Gujarati, Hindi and Marathi a large number of novels, literary prose works, philosophical treatises and even plays. His editorial work is also mind-boggling. It includes several volumes—with translations into Hindi and Gujarati—of Gandhian thought and the large number of mainly Hindi works by Kakasaheb Kalelkar. In addition to this he has been editing the leading Konkani Monthly (Jaag) for over 30 years and helping shape a generation of young Goans devoted to their motherland, language and culture. The Konkani world has gratefully acknowledged his yeoman service and dedication and honored him in innumerable ways.

Various quarters within and outside Goa have recognised the great worth of his contribution to literature, to Goa, to Konkani and to value based society oriented towards selfless love of the nation and a protected priority towards ecology. The long list of the literary as well as other awards which he has won is an apt manifestation of the social accolades showered on him. Some of these main awards are : Konkani Bhasha Mandal's and Kala Academy's awards for 1974-75, Sahitya Akademi's awards for both, original writing given to his travelogue *Himalayant* in 1977 and translation given to his *Ami Tankan Manshant Hadle* in1990; Central Hindi Directorate award for his Hindi biography of Kakasaheb Kalelkar in 1992, Swami Pranavananda Puraskar for his *Gandhi Yug Ke Jangam Vidyapeeth Mein* in 1990, Konkani Sahitya Ratna Puraskar given by the First World Konkani Conference in 1995, Gomant Sharada Puraskar, the highest State Literary award, given by Kala Academy, Goa in 1997.

Today Ravindrabab, as he is affectionately called by Goans, is a fulfilled man. Nonetheless, the devastation of ecology, the depletion of natural resources, the fast eroding values, and the alarming rate of cultural neo-colonisation continue to disturb him and compel him to voice his caution and advice through his regular writings in periodicals. Judged from his impact, his writing continues to be a source of inspiration and guidance for the Goans. They see it as their cultural legacy as also the sounding board of Goan sensibility and Konkani identity in the most liberal and tolerant sense.

*(हो लेख १ जानेवारी २००० ह्या दिसा The Navhind Times दिसाळ्याचे Millenium Celebration Supplement हे खाशेले पुरवणेंत उजवाडा आयिल्लो.)*

# रवीन्द्रबाब : साहित्यांतलें एक घराणें



♦ मित्रा बोरकार

**मैफिलींत पयलो "षड्ज" लायना फुडें गायकाची प्रगल्भता, सुराचें भावविश्व कशें आसतलें तें कळटा. रवीन्द्रबाबालें साहित्य वाचूंक घेतात तेन्नाय असोच अणभव येता. वाचपी वाचतां वाचतां बरोवप्याचे विद् वत्तेचो, ताच्या अणभवांचो, विचारांचो आस्वाद घेत घेत तन्मय जावन वता. गायनांत आसता तशी उतरांची अचूक फेक, स्वरांनी जशी आस आनी गुंजाईश आसता तशीच तांच्या विचारांनीय बी अणभवूंक मेळटा. वादी-संवादी विचारांच्या प्रभुत्वाची तांक - वाचप्याचेर एक तरेचो कैफ चडटा.**

संगीत आनी साहित्य हांचें नातें लागींचें. मनशाच्या मनाच्या विकासाचीं हीं दोन आंगां. साहित्यांतले तरेकवार भावभावनांनी भरिल्ले शब्द नादरूप धारण करतात तेन्नाच ते लोकांच्या काळजा मेरेन पावतात. हेच भशेन, साहित्यांतल्या शब्दां भितर वाचक आपले परीन एके तरेची लय आनी नाद अणभवतात. तेन्ना, सुरांची जोड नासतनाय एके तरेचें संगीत तांच्या मनाक साद घालता. ह्या संगिताचे सूर मनांत एक स्वतंत्र भावविश्व निर्माण करतात. लेखकाच्या आनी वाचकाच्या सुसंवादांतल्यान विचारांच्या सुरांची एक तर्कशुद् ध आनी शिस्तबद् ध रचना आकाराक येता.

पयलींच्या कांय अती श्रेष्ठ आनी प्रतिभासंपन्न गायकांनी आपले वैशिष्ट्यपूर्ण गायकीचे खाशेले शैलीचे निर्मणेंतल्यान संगितांतलीं घराणीं निर्माण केलीं. रवीन्द्रबाब केळेकार हांणीय बी अशेंच साहित्यांतलें एक वेगळेंच घराणें निर्माण केलां अशें म्हाका दिसता. हेच नदरेन हांवें रवीन्द्रबाबांचें जें साहित्य वाचलां ताचो आस्वाद घेवपाचो हांगा यत्न केला.

गायनाची मैफल म्हळ्यार कलाकार आनी आयकुपी हांचे मदलो संवाद. हे मैफलींत घडून येता तसोच वाचनाचे प्रक्रियेंत



लेखक आनीं वाचक हांचे मदीं संवाद घडून येता. लेखकाची रचना आनी वाचकाची रसीकताय एके पातळेर येतात तेन्ना ते रचनेक पूर्णत्व येता. दोन सुरांच्या एकत्र कर्णमधुर मिलापाक सूर संवाद म्हणटात. वाचक आनी लेखकाचे सूर अशेच जुळत जाल्यार त्या लेखकाच्या साहित्याचो आस्वाद घेतना एक वेगळोच अणभव येता.

प्रतिभावंत गायकान गायिल्लो एकूच राग खूब फावटीं आयकलो तरी तो दर खेपे नवो ताल्ल दिसता. तसोचसो अणभव रवीन्द्रबाबांलीं कांय पुस्तकां वाचतना म्हाका येता. तांचें एकेक पुस्तक म्हळ्यार भरदार विचारांच्या आदारान, विस्तारान मांडिल्लो ख्याल - एका तपस्वी साधक गायकान वाचका मुखार दवरिल्लो - 'खयाल' ह्या उर्दू उतरा पसून 'ख्याल' हो शब्द प्रचलीत जाला. 'खयाल' म्हळ्यार विचार. गायक-वादकाचे विचारशक्तींतल्यान खुलता तो ''ख्याल''.

रवीन्द्रबाबांलें दर बरप म्हळ्यार एक एक ख्याल. एकाद्रे घडणुकेचो वा विशयाचो राग घेवन, तांतूंतल्यान धीरगंभीर विचारांचे आलाप गुथून, ख्यालांचो आंवाट घेवन दुसऱ्याक चिंतन करपाक लावपी. सुशेगाद बसून तातूंत झोकून दिवन आस्वाद घेवपाचो. ''सांगचेंशें दिसलें तें थोड्या उतरां भितर सांगपाचो यत्न केला'' अशें तांणी *ओथांबे* पुस्तकांत म्हळां खरें. पूण ह्या ल्हान ल्हान लघुनिबंदांतल्यान लेगीत ते परते परते वाचल्यार, दर खेपे नवें कितें तरी मेळटा. तांतलें अध्यात्म, तांतलें तत्वज्ञान आमकां जिविताचे खोलायेंत व्हरता. गांधी, लोहिया, जयप्रकाश, विनोबा भावे हांचे विचार पचयल्ले रवीन्द्रबाब वाचप्याकूय तांच्या विचारांच्या सुरांनी न्हाणयतात. 'टी सेरेमनी'चें वर्णन करतना तर तांकां जयजयवंतीचे सूर वयर सरतात अशें दिसता. तातूंत एक जियेवपाची रीत, 'अ वे ऑफ लायफ' दिसता. एका एका सुराचो, एका एका खिणाचो आस्वाद घेत, विस्तार करीत वर्तमानांत पुरायेन जियेवपाची तरा ते वाचप्या मुखार दवरतात.

विचारांची मुरिल्ली कसदार बिलंपत, विलंबीत लयेंत केल्ल्या दर्जेदार आध्यात्मीक घोटीव विचारांची बढत, ख्याल गायनाची याद करून दिता. *ओथांबे* वा *घुसपल्लें जानवें* वाचतना हाचो अणभव येता. *ओथांबे* पुस्तकांत जरी तांगेलीं वेगवेगळीं चिंतनां आसलीं तरी एका आवर्तनांतल्यान दुसरें आवर्तन आयिल्ले वरी तीं चिंतनां दिसतात. एक धीरगंभीर 'पूरिया धनाश्री' गायिल्ले भशेन. कोमल आनी तीव्र सुरांचो आसपाव आशिल्लो ख्याल मांडिल्ले वरी... *ओथांबे* पुस्तकांत ''अध्यात्म तत्वज्ञान, धर्म कर्मकांड'' वा ''जिवीत म्हळ्यार साधना एक, जागरूकपणान आयुश्यभरं करपाची'' ह्या मुखेल विचारांची बिलंपत तांच्या सगल्या चिंतनांनी जाणवता. ''धर्म आनी अध्यात्म एक न्हय, अध्यात्म आमकां आमी कोण, हो संवसार कितें, संवसाराचो आनी आमचो संबंद कितें हें सांगता आनी जिविताचे खोलायेंत घेवन वता'' ह्या विचाराची बढत करीत एके लयीच्या आंगान विचार फुडें वतात. तशेंच ''गांधी, लोहिया, जयप्रकाश लौकीक नदरेन अपेशी लोक'' अशें म्हणटना, वा ''देश स्वतंत्र जाला खरो, पुणून आमचें मन? इंग्रज आयल्यात त्या वेळार आशिल्लें तशेंच उरलां. तेंच मन घेवन आमी आमचें स्वातंत्र्य तिगोवन दवरतले व्हय? आमचे कडेन मन बदलपाची खंयचीय कार्यावळ आसा व्हय?'' असले प्रस्न विचारतना कोमल हळवे सूर लागिल्ले भशेन दिसता.

*घुसपल्लें जानवें* ह्या पुस्तकाचे बाबतींतूय तशेंच घडटा ''आमी कुड्डे, अशीर मनाचे कशे जाले'' ह्या विचाराची बिलंपत ते ''आमच्यो गांठी निगरगांठी'' वा ''अखेर देश कोणाचो'' ह्या आवर्तनांनी करीत वतात. ''राष्ट्राभिमानानूच घात मारला ह्या देशाचो'' अशें म्हणटना लागिल्लो विवादी सूर मूळ ख्यालाक बादा हाडिना, लेख सोंपयतना ''राष्ट्राभिमानाची सुवात राष्ट्रभक्तीन घेवंक जाय'' अशें म्हणीत ते अचळय समेर येतात. 'अखेर देश कोणाचो' ह्या बरपांत लेगीत ''...भितर कितें खळबळून आयलें खबर ना, प्रार्थना चलत आसतनाच हुडके दिवन रडपाक लागलों, आयुष्यांत केन्नाच रडूंक ना इतलो-रडलों'' ह्या कोमल सुरार आवर्तन सोंपता. एकेक विचार घेवन संथ गतीन, सवाल जवाब करीत, सार्थ आनी ढंगदार आलापांनी सुंदर वेलबुटी करीत, चढे रंगतीन वचपी विचारांची मैफलः वाचपी केन्ना समरस जावन वता, कळना. संगिताचे सूर जशे सरळ आत्म्या कडेन संवाद साधतात, तशेच सच्च्या विचारांचे सूर वाचप्याच्या मना कडेन संवाद करतात. शिस्तबद्ध सादरीकरण, काळजाक भिडपाची आनी साद घालपाची त्या विचारांची तांक आमकां ह्या दोनूय पुस्तकांनी जाणवता.

ईश्वराक प्रसन्न करून घेवपाचो सोंपो मार्ग म्हळ्यार संगीत. मनशाक स्वतःक विसरूंक लावप आनी ईश्वर नांवाचे अज्ञात शक्ती कडेन आपल्यो सगल्यो मानसीक प्रेरणा एकरूप करप हो अध्यात्माचो सार एके तरेन ती एक समाधीची अवस्था जावं येत. हीच अवस्था अध्यात्मीक जिविताचें अंतीम साध्य आसता. ते अतिकठीण अवस्थेंत रवीन्द्रबाबान बरयल्लें *ओथांबे* सौंदर्यान युक्त वाचप्याच्या मनाची पकड घेवपी निबद्ध लेखन, विचारांचो विस्तार करतना, भावनेच्यो

रेकवार छटा दाखयतना जिवितांतल्या कोमल तीव्र अणभवांचो ोद घेतना जी अनुभूती मेळटा, तिचो प्रत्यय वाचप्याकूय मेळोवन देवपाची कळाशी ह्या बरपांत दिश्टी पडटा.

*घुसपल्लें जानवें* वाचतनाय एक शांत गंभीर रसाचो राग भाळयल्ल्याचो अणभव मेळटा. एके वटेन जातीकार्तीनी घुसपल्ल्या समाजाचें, नागवल्ल्या देशाचें चित्र ते वाचप्या मुखार पितारतात. दुसरे वटेन शिकिल्ल्या सवरिल्ल्याच्या देशमोगा आड जात कशी येता, हें सांगतना, गिरेस्त आसुनूय आमी गुलाम कशे जाले, वा ल्हान मन, मोटवी नदर देश व्हड करूंक पावत व्हय, हे प्रस्न विचारतना, भरभोंवतणीं चल्लां तें पळोवन तांचें मन खंती जातना तांचो सूर कोमल जाता. केन्ना केन्ना आर्जवी, खिणांत मोवाळ, ल्हवपीक, दुसऱ्याच खिणाक उबगणेचे, रागाचे संमिश्र भावनेन केल्लो आविष्काराचो मिलाफ, जाय थंय ठोस, सरळ मेकळे विचार, जाय थंय नरम, प्रत्येक उतराची मजा स्वतः घेवन वाचप्या मुखार ते दवरतात.



व्यासंगी वृत्ती आनी रसीली नदर घेवन जसो एक गायक वजनदार गायकी श्रोत्या मुखार मांडटा, तशीच नदर आनी वृत्ती आमकां रवीन्द्रबाबांल्या साहित्यांत दिश्टी पडटा. उस्ताद अमीर खाँ हांणी म्हळां, ''अव्वल कलावंत जावपाक फकत रियाज उपकारना, वांगडा रियाजतूय जाय''. ''रियाजत'' म्हळ्यार आध्यात्मीक तपाचरण. संगिताक पंचम वेद म्हणटात. देवा कडेन सरळ आनी प्रत्यक्ष अनुसंधान केले बगर गायन कलेंत सिद्धी जोडप अशक्य अशें म्हणटात. नादमधूर संगीत मन फुलयत, आत्म्याक जागयत जग विसरूंक लायता. तशेंच रवीन्द्रबाबांलें साहित्य. तांचें *तथागत* म्हळ्यार सेगीत पांच वर्सां रियाजत करून मांडिल्लो एक ख्याल विचारांची साधना करून, भरपूर रियाज करून, तेच बराबर अध्यात्माची जोड दिवन मांडिल्ली रचना. आपणाल्या आंतरीक विकासा वांगडाच वाचप्याकूय एके वेगळेच अनुभूतीचे स्थिती मेरेन व्हरपाचें तांचें कौशल्य हांगा जाणवता.



प्रज्ञावंत मनीस कसो वळखुपाचो हें सांगतना, बुद्धाल्या शिष्य सांगात्यांनी बुद्धमत्ताक कशें रूप दिलें, हाची फोडणिशी करतना, बुद्धमत्ताचो आपरोस आमकां दितना, त्या ख्यालाचो सर्वांगीण विचार, विचारांचे आलापींतली शांतता, उदात्तता, तातूंतलें गांभीर्य, बुद्धिवैभव तातूंत दिसून येता. विचारांची वीण घट्ट बांदिल्ली, खंयच सदळसाण ना. अभिजात गायनांतली ऐट, डौल, रसाळपण. एक तरल अंतःकरण पटल समस्त विचारसौंदर्य आत्मबिंबीत करपाक आशेल्लें दिसता. विचारांची भावोत्कट पेशकारी करतना जायते फावटी अविष्काराची कल्पना जितली सुंदर आसता, तितलीच ती सहजतायेन उतरल्या हेंय म्हत्वाचें आसता. ही सहजताय, एक संपूर्ण समर्पण ह्या पुस्तकांत दिसता. गायक स्वर लायतना जो आत्मशोध दिश्टी पडटा, तोच तांच्या विचारांनी जाणवता.

मनांत दाटून आयिल्ल्यो भावना अनावर जातात तेन्ना आपशींच स्वरांच्या, शब्दांच्या वा दुसऱ्या कसल्याय माध्यमांतल्यान एक सुंदर कलाकृती जल्माक येता. रवीन्द्रबाबांली *आमोरेर* ही अशीच एक रचना. तांच्या विचारांच्या आलापांत दुःखार्त जिवाचो उलो, आसक्ती, विरक्ती, भूतकाळाचे हिशेब, भविष्याचे वेध, वा जिज्ञासा - हें सगळें आवेगान व्यक्त जाल्लें दिश्टी पडटा. अंतःस्फूर्तींतल्यान



**पूत गिरीश, सून रोहिणी आनी नातरां - यशोदा, गायत्री, राजाराम...**

आयिल्ल्या ह्या विचारांनी तर्कसंगत, मधूर अश्या विचारांच्यो स्वरसंगती दिसपाक लागतात. काळजाचे उद्रेक, भावनेची संवेदना, गिन्यानाचें भांडार आनी विचारशक्ती ह्या सगल्याचो समन्वय तांच्या साहित्यांत दिसता. *आमोरेर* वाचप म्हळ्यार धीरगंभीर मारव्याचे सूर आयकल्ले भशेन. सगल्यो चित्तवृत्ती अंतर्मुख जावंक लावपी सूर जिवाक एक हुरहूर लायतात. सरळ काळजाक भिडत, भावनां कडेन संवाद साधतात. खरो गायक निमाणे मेरेन शागीर्दूच उरता अशें म्हणटात. *आमोरेर* वाचतना तसोच अणभव येता.

अब्दुल करीम खाँ साहेब खंय आपल्या गळ्यांतल्यान वेगवेगळ्या रागांतल्यान वापरांत आशिल्ल्यो सत्तावीस श्रुती लावन दाखयताले. मनीस सभावांतल्या कितल्याश्याच तासांच्या श्रुतींची अनुभूती वाचपी रवीन्द्रबाबांल्या साहित्यांतल्यान घेतात. एखाद्र्या कलाकारा प्रमाण वाचप्या वयली आपल्या विस्ताराची पकड केन्नाच सदळ जावंक दिना आसतना ताच्या मनाक आपल्या चिंतनांच्या आलापांनी गुल्ल दवरपाचें कसब तांचे कडेन आसा.

रवीन्द्रबाबांल्या मतान, तांचीं सगलींच पुस्तकां आपउकतावणेची. *ब्रह्माडांतलें तांडव* लेगीत. ''तें नक्षत्र विद्येचेर आसलें तरी तातूंतल्यान हांवें म्हाकाच चड उक्तायला'' अशें तांणी म्हळां. तशेंच तांच्या वे *वयल्यो घुलो* ह्या पुस्तकांत जावं वा *उजवाडाचे सूर* ह्या पुस्तकां जावं, तांचे सच्चे विचार, सहजसुंदर नादमय शब्द मनाक सा घालतात. संगिताचो बुद्‌धी परस चड अंत:करणा कडेन संबंद आसत अशें म्हणटात. एकाद्र्याचें भावपूर्ण, अद्‌भूत गायन आयकले उपरां अशें पिशें लागता की परत परत तेंच गायन, तेच सूर मनांत घोळपाव लागतात. त्या पदाक आनी तातूंतल्या आलापांक विसरून वंचपाच यत्न केल्यार लेगीत ते परते परते कानांत आनी काळजांत घुमपाव लागतात. असोच अणभव रवीन्द्रबाबांलें साहित्य वाचतकच येता एकाद्रो गायक मैफलींत पयलो ''सा'' लायता आनी मैफल जिखत तशीच सुरवात तांच्या पुस्तकांनी जाता. *उजवाडाचे सूर* हें अशेंच ए पुस्तक. वयर म्हणिल्ले प्रमाण एकच राग जरी गायकान परत पर गायलो तरी दर खेपे ताचें रूप वेगळें आसता. तांणी बावीस वस उपरांत *उजवाडाचे सूर* ह्या पुस्तकार परत हात ओडलो तेन्ना थोडे बरपां *बेसूर* दिसली म्हणून गाळ्ळीं आनी थोडे बदल केले. पू ''आदलेच नव्या रुपांत मुखावयले यात्रेक भायर सरलां'' अशें म्हणटात.

तांच्या ह्या पुस्तकांतलो पयलोच लेख म्हळ्यार भैरवांतली बंदीश कसो. भैरव सकाळीं गावपाचो राग. तो वातावरणांत उच्च पातळीचं आनंद निर्माण करता. ह्या रागाच्या गायनान आनी श्रवणान एके तरेची समाधी लागता. झिळमिळट्यार जागो जातकीर लेखक उजवाडाचे वाडटें रूप नियाळीत बसता. मागीर वेगवेगळ्या रंगांचे खेळ, शेवण्यांचे तरातरांचे सूर, सैमाच्या दर एका रुपाचो मूड, हें सगळें वाचतना एक वेगळोच आनंद मेळटा. विचारांचो सूर लायतना तांचो आत्मसो जाणवता. झाड पळयना फुडें तांकां एके तरेचे "Mystic Communion" शें दिसता. विवेकानंद जंय रावताले आनी बसताले ते सुवातेर बसपाचो अणभव घेतकीर तांणी उकतायिल्ल्यो भावन अध्यात्मिकूच आसात.

मैफिलींत पयलो ''षडज'' लायना फुडें गायकाची प्रगल्भता सुरांचें भावविश्व कशें आसतलें तें कळटा. रवीन्द्रबाबांलें साहित्य वाचूंक घेतात तेन्नाय असोच अणभव येता. वाचपी वाचतां वाचतां बरोवप्याचे विद्‌वत्तेचो, ताच्या अणभवांचो, विचारांचो आस्वाद घेत घेत तन्मय जावन वता. गायनांत आसता तशी उतरांची अचूक फेक, स्वरांनी जशी आस आनी गुंजाईश आसता तशीच तांच्या विचारांनीय बी अणभवूंक मेळटा. सुरवाते पसून तयारीची उपज घेवन निबंधाचे बंदिशींत रंग भरप, आनी मागिरूय बढत करतना एके तरेची मजा, लुत्फ आपणेंय घेवन वाचप्याकूय ती घेवपाक लावप आनी वादी-संवादी विचारांच्या प्रभुत्वाची तांक – वाचप्याचेर एक तरेचो कैफ चडटा. एकेक विचार सुरा भशेन मनार, काळजार बरोच वेळ तरळत उरता आनी परिणाम, त्या तरल विचारांची धुंदी. श्रवण, मनन, चिंतन ह्या सगल्या अवस्थांतल्यान गेले उपरांत वाचप्याकूय ते वाटेर अचळय चलपाक ते परावृत्त करतात. ह्या व्हड तपस्व्याच्या साहित्यान वाचप्याची ''ब्रह्मानंदी टाळी'' लागलिना जाल्यार अजाप म्हणपाचें.

वास्तव आहे. म्हणून तारतम्य आणि प्रमाणबद्धता यांचं भान हवं. गोमंतकीय समाजाला हे भान आहे.

रवीन्द्रबाब व्यापक दृष्टीचे विचारवंत आहेत. तसेच ते एका चळवळीचे खांदे आधारस्तंभ आहेत. एक विशाल उद्दिष्ट त्यांनी कोकणी माणसांपुढे ठेवले आहे. त्यांना कोकणी–मराठी वादातील अनेक पदर ज्ञात आहेत. भाषिक संघर्षाचे राजकारण त्यांना वर्ज्य नाही. त्यांनी आपले उद्दिष्ट स्पष्ट शब्दांत मांडून ठेवले आहे. त्यात द्रष्टेपणा असू शकेल. मी वास्तवावर उभा राहू इच्छितो. मात्र मला दिसलं तेच वास्तव असा आग्रह धरणे बरोबर वाटत नाही. म्हणून मी त्यांना मनापासून शुभेच्छा देतो.




रवीन्द्रबाबांनी केलेले ग्रंथातील कोकणी–मराठी संबंधांचे विवेचन बरेच प्रांजळपणे पण चळवळीचे भान ठेवून केलेले आहे. गोव्यात आरंभापासून कोकणी भाषा अस्तित्वात आहे आणि सांस्कृतिक गरजेपोटी गोव्याने मराठी भाषा स्वीकारली. पण कालांतराने मराठी गळून पडेल व कोकणी स्थिरावेल असा त्यांचा सिद्धान्त आहे. तरीसुद्धा कोकणीग्रंथ प्राचीनकाळी का उपलब्ध होत नाहीत? असा प्रांजल प्रश्न त्यांना पडला आहे. ते नव्या भाषाशास्त्राचा हवाला देऊन विवेचन करतात पण बोली आणि भाषा यांच्या वादात नवे भाषाशास्त्र (वर्णनात्मक) निर्णायक निवाडा देत नाही हे ते स्पष्टपणे नमूद करत नाहीत. शतकानुशतके इथे नांदत असलेल्या मराठी भाषेला 'परकी' ठरवणे योग्य होईल का? याचाही ते सहानुभूतीने विचार करत नाहीत. गफलतीने म्हणा, राजसत्तेमुळे म्हणा किंवा लोकेच्छेने म्हणा, मराठी गोव्यात ७०० वर्षे नांदत आहे, हे वास्तव आहे. याकडे पाठ फिरवता येईल का? याबाबत आचार्य काका कालेलकर यांनी *पुण्यभूमी गोमंतक* या ग्रंथात असे म्हटल्याचे आठवते की, 'कोकणी मराठीत विशिष्ट द्वैत किंवा विशिष्टाद्वैत असे संबंध आहेत.' म्हणजे द्वैत म्हटले तरी विशिष्ट आहे आणि अद्वैत म्हटले तरी विशिष्ट आहे. या भाषा परस्परपूरक आहेत. केळेकरांना ही भूमिका मान्य असल्यास काहीतरी समन्वय शक्य होईल. अन्यथा *'शुभास्ते सन्तु पंथानः'* असे म्हणण्याशिवाय मराठीला दुसरा पर्याय नाही. पण परंपरेपासून ठेवलेले हे प्रस्थान आहे, हे तर उघड आहे. इंग्रजीचा बागुलबुवा दोन्ही बाजूंनी दाखवला जातो तो बाजूस ठेवून निकोप आणि उदार भाषा व्यवहार चालू झाला तर ते समाजास उपकारक ठरेल. परस्परांचे भय वाटू नये. मर्यादांचे भान ठेवावे. वास्तव नाकारू नये. असे प्रयत्न झाल्यास समन्वय शक्य होईल.

'कोंकणी–मराठी वाद : काही अंतःप्रवाह', 'मराठी चळवळीचा पायाच मुळी असत्याचा', 'सहयोग अशक्य करून टाकला आहे मराठीने', 'संघर्ष टाळण्याचा फसलेला एक प्रयत्न' या चार प्रकरणांची शीर्षके बोलकी आहेत. त्याबाबत काही विस्ताराने लिहावे लागेल. तेवढा वेळ मला आत्ता नाही. पण एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. कोकणी एक स्वतंत्र भाषा म्हटल्यावर महाराष्ट्र आणि मराठीवाद हा संदर्भ सोडून विचार सुरू व्हायला आता अडचण नाही. निदान महाराष्ट्राला झोडपून कोकणीचे हित आता होणार नाही. तिने तिच्या वाटेने पुढे जाणे श्रेयस्कर ठरेल...

जाता जाता एक गोष्ट नमूद करतो. मी शिकत होतो तेव्हा संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन पेटले होते. नंतर मराठी भाषकांचे महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले. त्या कल्पनेचे पालनपोषण मराठी साहित्यिकांनी केले. सर्व ज्ञानविज्ञानाचा व्यवहार मराठी भाषेतून करण्याचा चंग बांधण्यात आला. साहित्य संस्कृती मंडळे आली. मराठी विश्वकोश रचला जाऊ लागला. त्या वातावरणांत आमची पिढी घडली. आज महाराष्ट्रात त्या वातावरणाचा मागमूस उरला नाही. मराठी विश्वकोश अद्याप पूर्णही झालेला नाही. तोपर्यंत मराठी विश्वकोश वाचता न येणारी पिढी पुढे आली आहे. पुणे विद्यापीठात उच्च ज्ञान विज्ञान मराठीतून देण्याच्या संकल्पाची आठवण उरलेली नाही... पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ बरखास्त झाले आहे. सगळे संदर्भ बदलून गेले आहेत... थोर विचारवंत वसंत पळशीकर यांनी 'नवभारत'च्या एका अंकात म्हटले आहे की, "महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेच्यावेळी असे वाटत होते की, आता जीवनाच्या सर्व क्षेत्रात या समाजाचे उत्थान होईल पण प्रत्यक्षात तेव्हाच ऱ्हासास सुरवात झाली." असं का झालं.... प्रश्न मनाला खिन्न करणारा आहे. कोणत्याही चळवळीत असलेल्या मंडळींना नाउमेद करू नये, अशा धोरणानं मी आजवर टीकात्मक लेखन केले आहे. म्हणून प्रस्तुत परीक्षणही मी इथेच थांबवीत आहे. त्यात प्रादेशिक अभिनिवेश आहे की देशी भाषांची कळकळ आहे ते वाचकांनी ठरवावे. एक वास्तव मांडलं गेलं आहे, असे त्यांस वाटले तरी पुरे.

# स्वगत: एक मुक्त चिंतन



♦ बाळकृष्णजी कानोळकार

**...म्हणूनच आज पंचवीस वर्षानंतरही त्यानी जे लिहिले ते वाचकाला मोह घालते, मोहित करते. आकर्षून घेते आणि वाचनानंतर अस्वस्थ करते, विचार करायला लावते. अस्वस्थ करणे, विचार करायला उद्युक्त करणे हा श्रेष्ठ साहित्याचा गुणधर्म आहे. आणि म्हणून त्यांनी 'स्वगत' सारख्या स्तंभामधून तत्कालिक प्रतिसादाच्या स्वरुपात केलेले स्फूट लेखनही या श्रेष्ठत्वाच्या सोपानावर जाऊन विराजमान झालेले आहे. तात्कालिकतेच्या मर्यादा भेदून चिरकालिक नि चिंतन झालेले आहे.**

'स्वगत' हे एक स्तंभलेखन. भल्या भल्यांना स्तंभित करणारे स्तंभलेखन. दैनिक नवप्रभाच्या रविवारच्या अंकातून गेली सुमारे पंचवीस वर्षे रवीन्द्रबाबांनी चालविलेले एक अग्निहोत्र. एक विचार 'चंक्रमण'. एखाद दुसरा अपवाद सोडला तर त्यांनी हे अग्निहोत्र अखंडपणे आनी अविरतपणे निरलसपणे आनी निर्भीडपणे चालविले आहे. आपपरतेच्या पलीकडे पोहचलेले ऋषितुल्य रवीन्द्रबाबच ते चालवू शकले. कारण ते एक 'फायटर' आहेत. *सर्जकाची आंतरकथा* या निबंधसंग्रहामध्ये त्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, ''मी 'लेखक' नाही. मी स्वत:ला कधीच लेखक मानलेले नाही. लक्ष्मणराव, बाकीबाब , मनोहरराय, पंडित हे लेखक. मी त्या जातकुळीतला नव्हे. मग मी कितीही का लिखाण केले असेना. दोन इंग्रजी शब्दांचा आधार घेऊन मी म्हणत आलेलो आहे, मी कोकणीचा 'रायटर' नव्हे, मी कोकणीचा 'फायटर'... लोकांसमोर - खास माझ्या सख्या सोबत्यांसमोर देखील— माझी प्रतिमा उभी राहिली आहे ती या 'रायटर'ची, लेखकाची. तीच माझी खरी प्रतिमा.''

खरेच आहे, रवीन्द्रबाबानी जे जे लिहिले ते ते अगदी

उसळून लिहिले, अगदी कळवळ्याने लिहिले, निरतिशय प्रांजळपणे लिहिले, हातचे न राखता लिहिले, आपपर न पाहता लिहिले. कोणताही मोह त्यांच्या लेखणीला मोहबंधनात अडकवू शकला नाही, धजला नाही आणि म्हणूनच आज पंचवीस वर्षांनंतरही त्यानी जे लिहिले ते वाचकाला मोह घालते, मोहित करते. आकर्षून घेते आणि वाचनानंतर अस्वस्थ करते, विचार करायला लावते. अस्वस्थ करणे, विचार करायला उद्युक्त करणे हा श्रेष्ठ साहित्याचा गुणधर्म आहे. आणि म्हणून त्यांनी 'स्वगत' सारख्या स्तंभामधून तत्कालिक प्रतिसादाच्या स्वरुपात केलेले स्फूट लेखनही या श्रेष्ठत्वाच्या सोपानावर जाऊन विराजमान झालेले आहे. तात्कालिकतेच्या मर्यादा भेदून चिरकालिक नि चिरंतन झालेले आहे. कारण त्यांनी आपल्या या लेखनातून चिरंतनाचाच - श्रेष्ठ जीवनमूल्यांचाच — सतत निदिध्यास घेतलेला होता आणि आहे. एक ऋषितुल्य जीवन ते जगले. तेच मूल्य त्यांच्या या लेखनालाही प्राप्त झालेले आहे. त्याच्या *ओथांब* या स्फूट लेखसंग्रहाचे परिक्षण करताना 'रवीन्द्रोपनिषद्' असा शब्दप्रयोग मी केला होता. तोच शब्द प्रयोग त्यांच्या 'स्वगत' मधील लेखनाच्या संदर्भातही मला पुनः पुन्हा करावासा वाटतो.

मी त्याना बऱ्याचदा भेटलेलो आहे. त्यांच्याशी बोललेलो आहे. कुवतीनुसार आणि कधीकधी कुवतीबाहेर जाऊनही त्यांच्याशी चर्चा केलेली आहे. परंतु ज्या ज्या वेळी हे घडले त्या त्या वेळी त्यांच्या घरून परत येताना विलक्षण समृद्ध अनुभव माझी सोबत करत होता, काही मौल्यवान विचाररत्ने गांठीला बांधून घेता आली, समकालीन एकूणच परिस्थितीचे आणि पर्यावरणाचे विश्लेषण करण्याची नवी दृष्टी मी घेऊन आलो. आजोबांशी नातवाने बोलावे वागावे तशा या भेटी असत. त्याने मी समृद्ध झालो. जे त्यांच्या बोलण्यात असते तेच त्यांच्या लेखनातही असते हे जाणवले. *'बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले'* या जातकुळीतले ते आहेत. आणि म्हणून त्यांचे लेखन 'चाले तैसा चाले-लिहे, स्वरुपाचे आहे.

त्यांच्या लेखनाचे स्वरूप हे 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' या प्रकारचे आहे. *''जे जे आपणासी ठावे। ते ते इतरां शिकवावे। शहाणे करुनि सोडावे अवघे जन॥''* हा वसाच जणू त्यांनी घेतलेला आहे. त्याच्या मूळाशी आत्मानुभूति आहे, अंतरीचा कळवळा आहे, स्फटिक धवल पारदर्शकता नि निर्मळ मन आहे. विषयानुसार त्यांची लेखणी प्रसंगी *'वज्रादपि कठोराणि'* होते. परंतु त्या कठोरतेचा ओरखडा ते आतल्या नितळ मनावर, कोमल हृदयावर उदू देत नाहीत. किती विषय? राष्ट्रीय अंतर्राष्ट्रीय स्तरावरचे, स्थानिक-प्रादेशिक स्तरावरचे, तात्कालीन, समकालीन, चीरकालीन स्वरुपाचे, समाज-संस्कृति, धर्म-उपासना, समाजकारण, राजकारण, अर्थकारण, संस्कृतिकरण, भाषाकरण, अध्ययन-अध्यापन,व्यक्ती-विभूति, लढे-चळवळी, ग्रंथ-पुस्तके, शोध-संशोध, असे शेकडो विषय त्यांनी या स्तंभलेखनातून आजवर हाताळलेले आहेत, मुखर केलेले आहेत. आणि त्यातून अनेकांच्या अंतर्यामी क्रांतीची स्फुल्लिंगे पेटविली आहेत. विश्रब्ध वार्तालाप मुक्त चिंतन आत्मचिंतन अशा मनन चिंतनपर स्वरुपातले हे लेखन आहे.

महात्मा गांधी, गौतम बुद्ध, स्वामी विवेकानंद, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. राममनोहर लोहिया, पंडित जवाहरलाल नेहरू, काका कालेलकर अशा अनेक विभूतिंविषयीं त्यांनी या स्तंभामधून लेखन केलेले आहे. परंतु ते पठडीबद्ध नाही. माहितीपर असूनही त्यापलिकडचे आपण स्वतःला समृद्ध करणारे असे काहीतरी वाचत आहोत याची तीव्र जाणीव वाचकाला झाल्याशिवाय रहात नाही. ते गांधीवादी आहेत. 'गांधी विचारच जगाला तारू शकतो.' या कालातित सत्यावर त्याचा अतूट विश्वास आहे. ते तसे लिहितातही. परंतु तरीही ते पठडीबद्ध गांधीवादी नाहीत याची प्रचीती त्यांच्या गांधी आणि गांधीवाद यासंबंधीच्या लेखनातून आपसूक येते. बुद्धाप्रमाणेच गांधींचाही प्रत्येकाने आपल्या स्वार्थासाठी वापर केला, हे सांगताना, त्यासाठी ते काँग्रेस पक्षाला जबाबदार धरतात. आज गांधी-आंबेडकरवादाला जे तोंड फुटले आहे त्याचा दोष गांधीजींची चुकीची प्रतिमा उभी करणाऱ्या काँग्रेस पक्षाला गेला पाहिजे असे ते निःक्षून सांगतात. 'गांधी आणि आंबेडकर -परस्पर पूरक' या 'स्वगता'त (२५.८.९१) ते लिहितात,

> ''शिक्षणाचा प्रसार झाला म्हणजे अस्पृश्यांची आर्थिक, सामाजिक स्थिती सुधारायला विलंब लागायचा नाही, पण-प्रश्न येतो तो 'धार्मिक' क्षेत्रांचा. तेथे अस्पृश्य अजून अस्पृश्य राहिलेला आहे. ब्राह्मणांना तेथे जे अधिकार आहेत ते अजून अस्पृश्यांना मिळालेले नाहीत. मंदिरात सहज सुलभपणे त्याना जाता येत असेल. पण अभिषेकाचा अधिकार, मूर्तीला आलिंगन देण्यांचा अधिकार, पूजा करण्याचा अधिकार- असले अधिकार अजून त्याना लाभलेले नाहीत.
>
> ते मिळाले पाहिजेत. आणि त्यासाठी गांधी आणि आंबेडकर दोघांच्याही मार्गांचा आपल्याला समन्वय साधता आला पाहिजे. एक मार्ग सवर्णांचा विवेक जागृत करण्याचा आहे. दुसरा, अस्पृश्यांची अस्मिता जागृत करण्याचा आहे. गांधी आणि आंबेडकर, दोघांच्याही भूमिका भिन्न असल्यां तरी परस्परपूरक आहेत असे माझे अभ्यासाअंती मत बनलेले आहे. दोघांच्याही भूमिका नीट समजावून घेऊन, शक्तींची वजाबाकी करण्याऐवजी गुणाकार करून आपल्याला पुढे जायचे आहे असे आपण ठरविले पाहिजे. अस्पृश्यता गेली पाहिजे या बाबतीत गांधी आणि आंबेडकर या दोघांचीही तळमळ तीव्र होती हे तथ्य लक्षात ठेवून त्यांच्यामधल्या (त्या काळातल्या) मतभेदाना विसरून आपल्याला एकत्र यायचे आहे, हे आपण विसरू नये.''

त्यांची गांधीवादावरील निष्ठा त्यांच्या लेखनातून सर्वत्रच अधून मधून डोकावतेच. पर्यावरणाचा प्रश्न असो की शेती आणि शेतकऱ्यांचा प्रश्न असो, औद्योगिकरणाचा प्रश्न असो की, शहरीकरणाचा, उद्योग-धंदे वा नोकरी व्यवसायाचा प्रश्न असो, शिक्षण असो की विज्ञान तंत्रज्ञानाचा प्रश्न असो, समाजकारण, धर्मकारण, राजकारण, अर्थकारण अशा मानवी संस्कृतीशी संबंधित अनेकानेक बाबींविषयीचा प्रश्न त्यांना गांधीवादाकडे घेऊन जातो. तेथेच त्याना त्याचा पर्याय वा जबाब सापडतो. त्यांच्यासाठी 'गांधी' कधीच आउटडेटेड झालेला

नाही आणि नसणार. ते लिहितात, ''गांधी आजच्या काळासाठी अपरिहार्य आहेत. तुम्ही त्यांच्यावर प्रेम करा वा द्वेष करा, पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे तुम्हाला जमणारे नाही.''

'भारतीय प्रकृती, संस्कृती अन् विकृती' (१७.१०.९३) या लेखात ते म्हणतात, ''विवेकानंद गांधीचे सुधारणेचे कार्य सरकारजमा झालेले आहे अन् उद्धारकांचे काम काही राजकीय पक्षांनी आपल्या हातात घेतलेले आहे.''

गांधीची ओळख ('एक विश्रब्ध . वार्तालाप', ०३.१०.९२) या लेखात ते लिहितात,



पान ३

स्वगत

पान ३

स्वगत

'हिंसद

धर्मप्रसारासाठी

''गांधीना विसरून जा. त्यांच्या काळात त्यानी जे केले ते सारे इतिहासजमा झाले ते तिथेच राहू द्या. आपण आता स्वतंत्ररित्या विचार करायला लागूया. 'इकोलोजी' नावाचे एक विज्ञान अलिकडच्या काळात जगातील विचारवंतांचे ध्यान खेचू लागलेले आहे, हे तुम्हाला ठाऊक आहे ना? तुम्ही त्यासंबंधी ऐकले तरी आहे ना? या विज्ञानाचे म्हणणे असे आहे की मानव जन्माला आला त्याच्या अगोदर लक्षावधी वर्षापासून सृष्टी चालत आली होती. माणूस सर्वात शेवटी आलेला आहे. सृष्टी केवळ त्याच्यासाठी देवाने (किंवा निसर्गाने म्हणा) निर्माण केलेली नाही. मानवाला येथे. जगण्याचा जेवढा अधिकार आहे तेवढाच किडी-मुंग्यांपासून हत्ती-गेंड्यांपर्यंतच्या सर्व प्राण्याना आहे. प्राणी-सृष्टी, वनस्पतीसृष्टी अन् जिला तुम्ही 'जड' म्हणता ती सृष्टी यांच्यामध्ये एक संतुलन आहे, हे संतुलन बिघडविण्याचा उपद्व्याप न करता माणसाला जगता आले पाहिजे.

'इकोलोजी'चा हा सिद्धांत तुम्हाला मान्य आहे ना? नसल्यास तुम्हाला मानव म्हणता यायचे नाही, दानव म्हणावे लागेल. तुम्ही जर मानव असाल-म्हणजे, पशुदशेतून देवदशेत जाणारे प्राणी असाल, तर इकोलोजीचा हा मूलभूत सिद्धांत सर्वतोपरी ठेवून तुम्ही तुमची जीवनशैली विकसित कराल. जीव-सृष्टीच्या विकासाच्या (एवोल्यूशनच्या) प्रक्रियेशी ताल धरूनच तुम्ही तुमचे विकासकार्य (डिवेलॉपमेंट) आखाल. सृष्टीत जे आहे ते सर्वांचे आहे. सर्वांसाठी आहे अन् या 'सर्वां'मध्यें तुमच्या नंतर येणाऱ्या असंख्य पिढ्यांचाही समावेश गृहीत आहे.

सृष्टीचे आपण मालक आहोत अशी जर तुमची समजूत झालेली असेल तर ती साफ चुकीची आहे. तुम्ही सृष्टीचे मालक नाही आहात. सेवक आहात, हे लक्षात ठेवा.

एवढे तुम्ही मान्य केले तर तुमचे राजकारण अन् अर्थकारण 'इकोलोजी'च्या तत्वानुसारच तुम्हाला चालवावे लागणार. पृथ्वीला लुटण्याचे सध्या जे उपद्व्याप तुम्ही चालवले आहेत ते तुम्हाला आपोआप बंद करावे लागणार. हवा, पाणी अन् जमीन प्रदूषित करणारे अन् ओझोनच्या थराला भोके पाडणारे उद्योगधंदेही तुम्हाला इतिहासजमा करावे लागणार. बस्. तुम्ही इकोलोजी मान्य करा. मग गांधींचे नाव जरी तुमच्या तोंडून निघाले नाही तरी काम मात्र तुम्ही त्यांचेच करणार.

मी म्हणत असतो, गांधींनी अलिकडे नवीन अवतार घेतलेला आहे अन् अिकोलोजी हे या अवताराचे नाव आहे. गांधींची ही अगदीच नवी 'ओळख' आहे.''

या स्तंभामधून केळेकरांनी भारतदेश आणि येथील विविध धर्म आणि पंथ यासंबंधाने विपुल लेखन केलेले आहे. भारताचा अभ्युदय तेव्हाच शक्य आहे जेव्हा खरे भारतीयत्व उदयाला येईल असे सांगताना आपल्या 'तेव्हाच खरे भारतीयत्व उदयाला येईल' या लेखात ते म्हणतात, ''हिंदू हा खरा हिंदू झाला पाहिजे. आजचा हिंदू विवेकानंदाच्या अनुयायांनाही आपल्यापासून दूर ढकतलो. चित्र पार बदलले पाहिजे. तेव्हाच या देशात खरे भारतीयत्व उदयाला येईल.''

रवीन्द्रबाब म्हणत, ''प्रत्येक लेखकाने सामाजिक बांधिलकी अंगिकारणे गरजेचे आहे कारण तो केवळ आपल्या लेखनाद्वारे वाचकांचे मनोरंजन करणारा विदूषक नाही. लेखक हा समाजाचा अध्यापक आहे आणि या समाजाच्या स्मृतिकारावर नैतिकदृष्ट्या सकस असलेले लेखन करण्याची जबाबदारी आहे.'' खुद्द रवीन्द्रबाब या व्रताला जागलेले आहेत. गोमंतकातील इतर राज्यातील वा केंद्रातील बरबटलेल्या राजकारणावर व राजकारण्यांवर प्रसंगी आसूड ओढायला त्यानी मागेपुढे पाहिले नाही. 'राजकारणाच्या अपराधीपणाचे गुन्हेगार' (२४.९.९५) या लेखात पंडित नेहरूंकडे यासंदर्भात अंगुलीनिर्देश करून ते लिहितात,

''जवाहरलाल सत्तेच्या खुर्चीवर बसल्यावर ते (स्वातंत्र्य-संग्रामाच्या चळवळीत पडलेले व्यवहारवादी) आपापल्या

प्रदेशातल्या सत्तेच्या खुर्चीवर दृष्टी ठेवून जवाहरलालजींची खुशामत करीत राहिले. जवाहरलाल मूळचे ध्येयवादी. पण थोडासा व्यवहारवाद (ज्याला ते प्रॅग्मॅटिझम् म्हणायचे) त्यांच्यामध्ये घुसला होता. 'खुर्चीवर दृष्टी ठेवणे स्वाभाविक आहे.' असे म्हणून त्यांनी या व्यवहारवादी लोकांकडे डोळेझांक केली. परिणामतः बरेचसे ध्येयवादी स्वातंत्र्यसैनिक काँग्रेसमधून बाहेर पडले, विरोधी पक्षात जाऊन बसले. अन् जवाहरलालजींना या व्यवहारवादी सहकाऱ्यांवरच अधिकाधिक विसंबून रहावे लागले.

आता हेच लोक 'राजकारणाचे अपराधीकरण कसे झाले' याचा शोध लावायला बसले आहेत. गृहस्थांनो, ज्या व्यवहारवादाच्या मदतीने तुम्ही पुढे आलात तोच तुम्हाला इथपर्यंत घेऊन आलेला आहे हे तुम्हाला ठाऊक नाही काय? कसला शोध लावला? स्वतःकडे जरा बघा, तुम्ही निवडून कसे येता हे पहा, म्हणजे अपराधीकरणाला कोण जबाबदार आहेत ते तुम्हाला आढळून येईल. तुम्ही स्वतःच याला कारणीभूत आहात. अलीकडच्या काळातला सर्वात मोठा घोटाळा - जो 'हवाला घोटाळा' या नावाने ओळखला जातो - त्यात कुणाकुणाचे हात बरबटलेले नाहीत? नरसिंहरावांचे बरबटलेले आहेत. देवीलाल, चंद्रशेखर, सुब्रह्मण्य स्वामी - फार कशाला, लालकृष्ण अडवाणींचेही बरबटलेले आहेत. सुप्रीम कोर्टात ही केस अजून भिजत पडलेली आहे. तिचा निकाल अजून का लागत नाही? तुमचा व्यवहारवादच तुम्हाला काळ्या पैशाकडे घेऊन गेलेला आहे. तुमचा व्यवहारवादच राजकारणाच्या अपराधीकरणाला कारणीभूत झालेला आहे. चंद्रस्वामींकडे तुम्हा सर्वांना कोण घेऊन गेला? व्यवहारवादच ना? हा व्यवहारवाद सोडण्याची हिंमत तुमच्यामध्ये आहे काय?''

तुकाराम, नामदेव, ज्ञानेश्वर, कबीर,चक्रधर इत्यादी संत आणि त्यांचे कार्य केळेकरांच्या चिंतनाचा विषय झालेले आहेत. 'ब्राह्मणशाहीच्या नादीरशाहीत' या लेखमालेतून त्यांनी याविषयी या स्तंभातूनच लिहिलेले आहे. त्याच प्रमाणे गोव्यात येण्यासाठी धडपडणाऱ्या नायलॉन ६,६ सारख्या बहुराष्ट्रीय कंपनीच्या विरोधात त्यानी सातत्याने लिहिलेले असून अशा प्रकारच्या लोकलढ्यात नेतृत्व करणे सुळावरची पोळी कसे आहे हे सांगत असताना नायजेरियातल्या केन सारोविवा या लोकनायकाची ते वाचकाना ओळख करून देतात. (९.६.९६)

त्यांनी विविध प्रकारचे लेखन केलेले असले तरी जर कधी काळी 'समग्र रवीन्द्र साहित्य' संग्रहित करण्याचे ठरले तर त्यामध्ये फक्त आपल्या चिंतनपर साहित्याचा समावेश करू असे त्यांनी एके ठिकाणी म्हटलेले आहे. 'स्वगत' मधून त्यांनी मराठी भाषेतून जे 'नवप्रभा'त लिहिले त्याच विषयावर किंबहुना बरेचसे हुबहु वा स्वैर अनुवाद वाटावे असे लिखाण त्यांनी 'जाग' या कोकणी मासिकाच्या 'नदर संपादप्याची' या संपादकीयातूनही पुनःसर्जित केलेले आहे. परंतु त्यातूनही वाचनीयता, विचारप्रेरकता व स्फोटकता हे त्यांच्या लेखनाचे 'फायटर' गुणविशेष प्रकर्षाने जाणवल्याशिवाय रहात नाहीत.

त्यांच्या या 'स्वगता'चा मी एक नियमित वाचक. एखादा लेख चुकला तर चुटपुट लागून रहाते. तो कधी एकदाचा मिळवून वाचेन असे होते. त्यांच्या सहवासापूर्वीच त्यांचा सार्थ परिचय त्यांच्या या 'स्वगत' शील लेखनातून फार पूर्वीच मला झाला. कोणताही विषय त्यांच्या लेखणीला कधीही वर्ज्य नव्हता आणि नाही. कोकणी लढ्याच्या पर्वाचे तर ते निशाणच होते. 'त्यांचे लेखन नव्या पिढीकडून कितपत वाचले जाते याचा हिशेब मांडला तर पदरी निराशाच येण्याची जास्त शक्यता आहे.' अशी आशंका त्यांच्या एका वाचकाने (नवप्रभा, ११ फेब्रुवारी २००१) व्यक्त केलेली आहे.

परंतु मला वाटते ती अनाठायी आणि अकाली आहे. नपेक्षा अविचलपणे पंचवीस वर्षापेक्षा अधिक काळ त्यांचा हा 'स्तंभ' वाचकांना प्रेरणा देत उभाच राहिला नसता. तो नरसिंहाचा स्तंभ आहे.

पंचवीसेक वर्षांच्या या अक्षरहोत्रात त्यांनी सुमारे बाराशेच्या आसपास लेख लिहिले. त्यांच्यातील विषयवैविधता आणि विषयसयुक्तता, काळसापेक्षता ही तर लक्षणीय आहेच शिवाय अगदी थोडक्यात त्यांच्या या लेखनाची गुण वैशिष्ट्ये नोंदवावयाची म्हटले तरी खुपच मोठी सूची होईल. गहन तत्त्वचिंतन, सखोल विवेचन, मनमुक्त वार्तालाप, प्रवाही निवेदन, प्रभावी विषयप्रतिपादन, प्रांजळ मत प्रदर्शन, प्रखर देशभक्ती, करारी स्वाभिमान, वस्तुनिष्ठता, धीर गंभीर परिणामकारक परंतु सहजशैली, साधी सोपी सरळ ओघवती परंतु प्रभावी भाषा ही त्यापैकी काही ठळक म्हणून सांगता येतील.

त्यांच्या या लेखनामधून त्यांच्या व्यक्तित्त्व आणि व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूंचे तेजस्वी दर्शन होते. गांधीवादावरची ध्रुव-अढळ विश्वासयुक्त श्रद्धा, तत्त्वनिष्ठा, साधुत्त्व, मानवतावादी धारणा, साधेपणा, दीनबंधुता, वृत्तिगांभीर्य, प्रखर राष्ट्राभिमान, अक्षर संस्कारितता, अनागृहीवृत्ती, कणखर बाणा, कमालीचा आत्मविश्वास, बहुश्रुतता, बहुभाषिकता, सहानुभूति इत्यादी गुणसमच्चयांचा एकत्रित असा सुखद सहवास त्यांच्या या 'स्तंभ-सांधिन्या'त वाचकाला लाभतेच.

रवीन्द्रबाबाना आपल्या या लेखनाचे मूल्य आणि महत्व पुरेपुर ठाऊक आहे. आणि म्हणूनच त्यानी ते अमृतनिष्ठेने अव्याहतपणे चालू ठेवलेले आहे. त्यांच्या कालजयी वकुबाविषयी ते निर्भर-निश्चिंत आहेत. आणि म्हणूनच ते याविषयी म्हणतात, ''माझे लेखन हे केवळ आजच्या पिढीसाठी नसून पन्नास वर्षांनंतर माझे साहित्य वाचणारा वाचक त्याचा कशा प्रकारे स्वीकार करील हेही माझ्यासाठी महत्त्वाचे आहे, कारण जर त्याला माझ्या लेखनातून मी एक सामान्य दर्जाचे लिखाण करणारा सामान्य लेखक आहे असे वाटत राहिले तर तो लेखक म्हणून माझा पराभव ठरेल.'' आणि मला खात्री आहे की त्यांच्या कालजयी लेखणीचा, स्फोटक शब्दब्रह्माचा असा पराभव कालत्रही होणे नाही.



# रवीन्द्रबाबांल्या बरपांत म्हज्याच विचारांक उतरां मेळिल्ले वरी म्हाका दिसता

♦ प्रतिभा बापट

'नवप्रभां'त प्रसिद्ध जावपी 'स्वगत' सदरा पसून हांवें रवीन्द्र केळेकारांचें साहित्य वाचपाक सुरवात केली. 'जागां'तली 'नदर संपादप्याची' आनी 'कोंकण टायम्सां'त उजवाडा येवपी तांचे लेख - इतलेंच हें रवीन्द्रबाबांचें साहित्य हांवें वाचलां. ह्या अर्थान हांव तांच्या साहित्याचें एक 'धाकटें' वाचक. आनी तरी, रवीन्द्रबाब म्हजो एक आवडटो लेखक अशें हांव मानतां. हें वाचून कांय जाणांक हांसोय येवं येता. तरी हांव म्हजें मत हांगा मांडपाचें धाडस करतां. रवीन्द्रबाबांल्या साहित्यानूच म्हाका हें बळगें दिलां.

वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध जाल्ल्या आनी म्हाका आवडिल्ल्या सगळ्या बरपांचीं हांव कात्रणां काडटां आनी तीं सांबाळून दवरतां. 'स्वगता'चींय कात्रणां हांव अशेंच सांबाळून दवरतालें. हीं कात्रणां म्हळ्यार म्हजें भांगर कशें. तीं हांव कोणाक पातये नासलें. कोणाकूय तीं वाचूंक दितालें तेन्ना यादीन परतें मागून घेतालें. मुखार म्हाका दिसपाक लागलें, बरें साहित्य चडांत चड लोकांनी वाचपाक जाय. तें घरांत आरमारींनी दाळून, सांबाळून दवरून कांय उपेग ना. मागीर हांव आपूण जावन म्हज्या कात्रणां, मासिकां खातीर नवे नवे वाचपी सोदूंक लागलें. 'स्वगता'चीं कात्रणां अशींच एक दीस कोणाक तरी दिलीं, परतीं हाडून दी म्हूण सांगून. पूण हो वेळ मेरेन तीं परतीं म्हजे कडेन पावंक नात...

रवीन्द्रबाबांचें साहित्य म्हाका कित्याक आवडटा, खूब फावटी हांव विचार करतां. आनी, रवीन्द्रबाबांनीच एके कडेन बरयल्लें ती म्हाका याद जाता - जे विचार आपल्या मनांत आसतात तेच एकाद्र्या लेखकान उकतायले म्हणटकच तो लेखक त्या मनशाक आवडपाक लागता; आपल्याच विचारांक उतरां मेळिल्ले बशेन ताका दिसता. कांय प्रमाणांत म्हजेंय अशेंच जालां अशें हांव म्हणन.

. कितें तरी वेगळें करपाचो ध्यास लागपाचें वय आशिल्लें तेन्ना म्हाका एक मनीस मेळ्ळो, आनी ताणें आपले पद्दतीन साम्राज्यशाय म्हळ्यार कितें तें म्हाका समजावन सांगलें. पूण साम्राज्यशायेचो अर्थ म्हाका चड बरो समजलो रवीन्द्रबाबांल्या लेखांतल्यान. जशी गायेच्या दुदा विशीं तांगेलो एक लेख आसलो. दुसरो लेख संवसारांत चलपी सौंदर्य स्पर्धे विशींचो. ह्याच विशयाक धरून एप्रील-मे २००७ च्या 'जागां'त 'अमेरिकेचे लोकशायेचीं काळीं कर्तुबां' म्हूण तांणी संपादकीय बरयल्लें. तें 'सुनापरान्ता'च्या वाचप्यांनी मुजरत वाचचें म्हूण हांवें एक चिट्टय बरयल्ली...

भुरगेपणा सावन धर्मा धर्मा मजगतीं हांवें वेगळेचार मानलोना. पूण म्हज्या धर्मांतले ज्ञानेश्वर, विवेकानन्द, सावरकर म्हाका खूब आवडटाले. जिविताची वाट चलतना हांवें सदां प्रामाणीकपण राखलें. चुकूनय कोणाचो म्हजे कडल्यान घात जावचो न्हय म्हूण जतनाय घेतली. पूण एक सामको लागींचो इश्ट, म्हज्या धर्मा वेल्यान, वयर उल्लेख केल्ल्या म्हज्या आदर्श विचारवंतां वेल्यान, म्हज्या वागपा-उलोवपा वेल्यान म्हाका आपणालें दुस्मान लेखपाक लागलो. तेन्ना म्हाका खूब त्रास जावचे, दुःख जावचें. आनी ह्या वेळार रवीन्द्रबाबांल्या साहित्यान म्हाका खूब आधार दिला. गांधीजींच्या जिविता विशींचे आनी तांगेल्या विचारां विशींचे रवीन्द्रबाबांले लेख, पयलींचे सावरकर आनी उपरांतचे सावरकर वेगळे कशे हें दाखोवन दिवपी तांचीं बरपां, संत ज्ञानेश्वर आनी स्वामी विवेकानन्दांचें हिन्दुत्व समजावन सांगपी तांगेलें लिखाण - हें सगळें सादे सरळ भाशेंत ज्युस्त गरज आशिल्ली तेन्ना म्हज्या हातांत पडलें आनी म्हाका थाकाय मेळ्ळी. म्हजी वाट हांव चुकूंक ना हे विशींचो विश्वास म्हज्या मनांत उदेलो.

रवीन्द्रबाब कितल्याश्या विशयांचेर बरयतात. संवसारांतल्या मनीसपणान चलपी विचारवंतां विशीं, देशप्रेमा विशीं, आपणाल्या वेगळ्या अस्तित्वा विशीं - कित्याचेरूय बरयतना ते पोटतिडकेन बरयतात. केन्ना केन्ना, कोणें खंयच्या पुस्तकांत कितें बरयलां तें सांगून ताची सुंदर अर्थावणीय करतात. तर केन्ना, आपूण अमके कडेन गेल्लों तेन्ना अमक्याक अमकें म्हळें अशें म्हूण सुरवात करीत समजुपाक सामको कठीण आशिल्लो विचार सोंपो करून सांगतात. केन्ना सामके क्रांतिकारक जावन वाचप्याक हालोवन जागोवपी, तर केन्ना आपलेच भितर गुल्ल आशिल्ल्या, वयले वयर उडपी मनशाक ताच्या हाताक धरून बऱ्याच्यो आनी खऱ्याच्यो चार गजाली सांगपी असो हो लेखक.

तॉलस्तॉयाच्या जिविता विशीं तांणी 'जागां'त दोन-तीन वांट्यांनी बरयल्लें तें वाचून म्हाका दिशिल्लें, तॉलस्तॉयाचे बायलेचेर तांणी अन्याय केला. तांकां चीट बरोवन हांवें म्हजें मत कळयलेंय. आनी मुजरत चिटीक जाप बरोवन तांणी तें मान्यूय केलें. पूण आपणें तशें कित्याक बरयलें हेंय तांणी म्हाका सांगलें...

दोन तीन खेपो रवीन्द्रबाबान म्हाका 'यो! बसून उलोवया' म्हूण बरयलां. पूण तांचे विशीं म्हाका दिसपी अती आदर, आनी बायलांच्या स्वातंत्र्या खातीर कितें तरी करपाचे म्हजे धडपडींतलीं कांय कामां - शिर्वीस आनी भुरगीं सांबाळून हें सगळें करपाच्या बोवाळांत म्हाका तांचे म्हऱ्यांत वचून उलोवप अजून जमूंक ना. पूण, खरेंच सांगतां, खूब फावटी तांची मूर्त दोळ्यां मुखार हाडून म्हजें माथें हांव तांच्या पांयांर दवरतां आनी शांत शांत जातां...

## जाण्टेल्याचें घर

– तुकाराम रामा शेट

जाण्टेल्याचें घर राजांगणाचें
बांदावळ घरची चोंयवशीन
मर्दी चौकोनी राजांगण
जाण्टेल्याच्या घरांत
पावसा वखतार पडटा पावस
वोता वखतार पडटा वोत
नाजाल्यार आसाच सांवळी
राजांगणांत सैमाचो आपालिपा खेळ

जाण्टेल्याक विचारलें अशें कशें?
तो सांगपाक लागलो –
उजवाड घरांत खेळपाक
वारें वाकुळपाक
बापायन बांदिल्लें घर

जाण्टेल्याक बापाय कडल्यान
मेळलेलें घर
मेळलेलें राजांगण
तशें ताका राजांगणा वयलें
मेळटालें मळब
राजांगणा वयलें किरणवोत
वावशी, वावझड, पावस
झुळझुळपी वारें, मोड
शरद चान्नें, शिगम्याचें चान्नें,
चान्न्याच्यो सगळ्यो सया
वावुरताल्यो राजांगणांत
वर्सां वर्साचे सूर्य चंद्र
घरा वयर जाताले किरमोर
आपालिपा खेळटाल्यो
रंगयाळ्या रुतूंच्यो 'परी'

हो जाण्टेलो हिकमती
सगळें ताणें करून एक
ताचें ताणें केलें जीवनगीत
गायत जीवनगिताचे सूर
रुजयले काळजामनांत

दुदाचें करचें लोणी
लोणयाचें करचें तूप
तशी ताणें केली रचना
आपले प्रतिभेन नी प्रज्ञेन

जाण्टेल्यान राजांगणा वयल्या
आकाशाचो दिलो आमकां ध्यास
वोताचे परजळीत दिले विचार
पावसांतल्यान आंकुरले साहित्यशब्द
काळजांत केळयले चान्न्याचे भाव

पूण आमी ताचे आसले कोण?
ना रगताचे संबंदी
ना सोयरे धायरे
तशे, आमी ताचे कोण नासून
आमकां ताणें दिलें खूब

दिलें ताणें खूब खूब
तरी ताचें जालें ना उणें
आदले वरीच ताच्या घरांत
भरभरून देंवता वोत
शिडशिडून पडटा पावस
सोबीत शितळ हांसता चान्नें
सैमान भरता सगळें

आजून ताच्या घरांत
मळब रंगरंगयाळें
दिकां दिकांचें आसता उलयत
रुतू सजयता सृजनाचे सुवाळे
सपनांची जाता समरादना
घरांत गेल्यार दर मनशाक
पेणिपेणींनी कुचकुचीत
माडायेदो भेट्टा मनीस

प्रियोळ,
३ ऑगस्ट २००७.

# रवीन्द्र चंद्रम्या

– रमेश भगवंत वेळुस्कार



उतरामृत जें
तुवें दिलें तें
फुलयत गेलें
चक ऋतुचें
अस्मितायेचें
रुजोवन गेलें
गीत मातयेचें

तूं ल्हारांचो
फेस करसो सो
आश्विन पुनवे
धर्वी कुपां सो
वेळेवयल्या
घुलांत उदेलो
उतर वोंवळांचो
गस्त वसो

चिंतन गर्भा
तुजी साधना
व्हांवत येता
हिमालयासून
प्रासून पाणी
भाग्रतिचें हें
गोंय गायता
गगन गुणगुण

चंवरांचीं औरांच
आतां हीं
लोटत येतलीं
शिरंतरांतल्यान
घोष करीत तीं
स्वास्तित्वाचो
झरत रावतलीं
निरंतरांतल्यान



# लोकभासांचें मीर्ग लागलें

♦ रवींद्र केळेकार

पोरणें देणें घडिये टळत. पणून पोरणो संकल्प टळना म्हण्टात. दोन वर्सां वैर जाल्लीं जातलीं, कोंकणी भाशेंत एक नेमाळें चलौंचें अशें आमी येवजिल्लें. पुणून जायते आडमेळ्यांक लागून तें ते वेळार भायर सरूंक पावलें ना. आयज दोन वर्सां उपरांत आनी इतले पैशिल्ल्यान कित्याक जायना, अेक पोरणो संकल्प फळाक येता हें पळौन जिवाक ल्हाना-सामान्यांतली खोस जायना!





Reg. No N

कोंकणी पंद्रशी नेमाळें

संपादकीय —

लोकभासांचें मीर्ग लागलें

संवसाराचो एक नेम असो आसा किं जेन्ना जेवपाखावपाक अन्न मेळना तेन्ना लोकसंख्या वाडटा. कोंकणींत बरौपी लोक चडशे नात, वांचपी आनी भौ करून विकतें घेवन वाचपी कितले मेळतीत म्हणपाची खातरी कोण दीत? आनी तरी आसतना अेका फाटल्यान एक नेमाळीं अुजवाडाक येंवक लागल्यांत! हे 'कित्याक किते' चल्लां जायत; पुणून ताका उपाय ना. जीवन जशें आसा तेच रुपान ताजेकडेन पळौंक जाय आनी तातूंतल्यानच वाट काडूंक जाय. अेक मात दुबावांविरैत सांगूं येता जे नेमाळ्याक बरौप्यांचो, वाचप्यांचो आनी ग्राहकांचो पालव ना ताजे पिरायेची खातरी दिवंक येना.

संवसारांत जायतीं नेमाळीं भायर सरतात तातूंत आनीक अेकाची भर घालची हे हेतून आमी हें अुजवाडावंक ना. कोंकणी आमची आवैभास, आमचो आत्मो. तो पालेतलो, फुलतलो, परमळटलो कोंकणी मार्फतूच म्हणपाचें आयचें विज्ञान सांगता. मागीर ती कोंकणी कितलीय ल्हान आनी 'हेंगाडी' आसना! मनशाचे अंतस्कर्णाचे तळामेरेन पावपाचें अेकूच साधन म्हळ्यार ताजी भास. तो दुसऱ्या भासांनी अुलौंक बरौंक शकना असो हाजो अर्थ न्हंय. नाटकांत दादले बायलांचें संवंग बेस बरें करून दाखैनात? सभाविकपण आनी अभिजातपण आवैभाशेंतूच आसता.

हे तत्वाचें म्हत्व वळखून हिन्दुस्तानांतल्या फाटीं पडिल्ले जमातींच्या कितलेशेच ल्हानल्हान भासांक लेगीत वैर काडचेले यत्न सुरू जाल्यात. आनी सामान्यतायेन जांकां हिन्दी भासांच्यो 'बोली' मानतात त्या मारवाडी, मेवाडी, हरियानी, बुन्देली, भोजपुरी, मगदी, कुमाअुनी, गढवाली, मैथिली सारक्या पोटभासांतूय पुस्तकी बरपावळ सुरू करची आनी जायते भासांनी ती जाल्याय — आनी सगले वेव्हार तांचे वरवी जांवचे अशे हिन्दी भाशेचे एक अूंच पांवड्याचे बरोवपी महापंडित राहुल सांकृत्यायना सारके म्हण्टात. म्हण्टकर जांकां वैलें मत्त मान्य आसा ते कोंकणीचे पुंत ओगी कशे रावतीत?

हे तत्वाक लागून आनी कोंकणीविशी आमकां जी भक्ति दिसता तिका लागून तिची तांकत तशी सेवा करची म्हणून आमी हें नेमाळें अुजवाडाक हाडलां. कोंकणीचेर तिजे पुतांकडसून आनी हेर लोकांकडसून आयजवेर जो अन्याय घडला तोय धुवन काडपाक जाय.

लोकभासांची वाड करचेले वैलें म्हणणे आड कांय जाण जो अेक मुद्दो फुडें करतात ताका आदीं जाप दिवपाक जाय. ते म्हण्टात किं हिन्दुस्तानांत आदींच पैलीं जायत्यो भासो आसात. तांची अेकामेकांकडेन चल्लेलीं केस्तावां पळेत जाल्यार दुसऱ्या ल्हान ल्हान भासांक आनी पोटभासांक, आमी म्हण्टात ते भाशेन वैर काडचेले यत्न चल्ले जाल्यार सातशीं पन्नास वेगळीं 'पाकिस्तानां' निर्माण जावन हिन्दी राष्ट्राच्यो तिसत्योवादन्यो जातल्यो. हांचे मत्तान भास म्हळ्यार 'प्रांत'!

आमकां हे भंयाचो निखालूस भंय दिसना. 'पाकिस्तानां' निर्मितात त्यो भासो न्हंय. तांचीं कारणां वेगळीं आसात. अेक तर प्रांतांच्या आनी भासांच्या झगड्यांनी कांय जाणांचे सुवार्थ घुसपल्ले आसात. (Vested interests) आनी दुसरें, वेगळेचाराचें वीख आमचे मेंदूंतूच आसा. तें जेमेरेन थैंय आसा तेमेरेन तें भाशेचे प्रस्नांतूच न्हंय तर खैंचेय निरुपद्रवी प्रस्नांत देंवक शकता. देखून 'पाकिस्तानां'चे भंयान भासांचे वाडीक आडमेळीं हाडचेपरस हें वीखाकूच आनी 'घुस्पल्ले सुवार्था'क ना करपाक आमी वावरुंया. प्रस्न टाळ्ळे म्हणून ते टळनात आनी टाळून ते सुटीय नात.

आमचे मत्तान संवसारांतले ल्हान व्हड सगल्या भासांनी आपणालो संवसार आतां नीट मांडपाक लागूं जाय. सभ्यतायेचें आनी संस्कृतायेचें हें मागणें आनी लक्षण आमी विसरूंक फावना. मनीस जेन्ना भक्तीन आपणाले आवैभाशेची सेवा करतलो तेन्नाच ताचो आत्मो परमळटलो, आनी तेन्नाच तो दुसरे भासांची, आपले देशाची आनी संवसाराची खरेली सेवा करूंक पावतलो.

हें सत्य कोंकणी अुलौपी लोकांमुखार दवरचेले हेतून आमी हें नेमाळें अुजवाडावंक फुडें सरल्यांत. हो युगधर्म पाळपाचे बाबतींत आमी फाटीं अुरचे नात म्हणपाची आमकां खातरी आसा.

आतां लोक-भासांचें 'मीर्ग' लागलें; रोव घालूंया!

*(मीर्ग वर्स १ आंक १, १५ऑगस्ट, १९५३)*

# Ami

♦ Ravindra Kelekar

*'Gomant Bharati'* cho ho ank tumchea mukhar asa. Ho ank nomuneacho *sample issue*. To tumkam manov'lo zalear he bhaxecho ek ek ank sat-sat disam-nim tumchea hatant diupacho amcho bet asa.

*"Gomant Bharati"* mhunnlear kitem? "Gomant" mhunnlear *Goem*. Punn Goem mhunnlear aiz ami Purtugezam chea xeka-tolla asleli bhuim oxem man'tanv. Dekhun jatunt Konkanni bhas uloupi soglleam lokam-cho as'pau zata oxem *Gomant* hem nanv ami poson't kelem. Gomant mhunnlear Konkanni bhas uloupi sogllo lok -- to magir zaum Goem-cho, zaum Karwar-Manglore-cho. Ani *Bharati* mhunnlear bhas, sorospot, sonvskrutai. Konkanni bhas, Konkanni sorospot ani Konkanni sonvskrutai hanche vaddik vavurta ti *"Gomant Bharati"*.


GOMANT BHARATI
गोमंत भारती
Ami

Amchea lokam modem jem kitem borem-bholem asa tem *Bharatant* patllaup ani *Bharatant* jem kitem borem bholem asa tem amchea lokam modem patllaup ho "Gomant Bharati" cho het. Ami hea khatir vavurchem kelam.

Amchi Konkanni bhas Maratthi, Guzrati, Hindi hea bhasam-chi ek bhoinn-bhas. Punn Maratthi, Guzrati and Hindi bhasank voir kaddpakhatir zoxe tea-tea bhasam-che put vavurlet toxe vavurpi Konkanni bhaxek mell'le nat. Amacheantlea xiklolea lokan Inglez, Purtugez, Maratthi ani dusream bhasam-chi jitli kamaiski keli titli aple avoibhaxechi koruk na. Haka lagun amchi bhas *kundde kuskutta (Cyndrella)* sarki urli; Tichi tank vhodd'li, punn tichi sorospot dublli. Ticheo bhoinni fuddem geleo. Ani ti babddi toxich fattim podd'li.

Kuddik s'vas toxi at'meak bhas. S'vas on'dilear zoxi kudd fodd'fodd'tta toso bhas on'dilear atmo ghusmott'ta.

Aiz Sonvsar boroch fuddem gela. Ani Bharatant'leo amcheo mauxebhaso-i fuddem geleat. Oxea vellar ami amche bhaxechi sarki seva keli na zalear ami fattim podd'tole ani ek dis kabar zaun vot'le.

Punn to vaur eklea-duklea mun, xeacho nhoim. Dha zannancho hat taka lagunk zai. Ani dha zannancho hat hea vaurak lagtolo zalear ami amche bhountoni ubeo kel'leo zat-kati-cheo ani Dharmacheo vonntti moddunk zai. Zat-kat tor soddankuch zai ani Dhor'mache bab'tint ami udar zaunk zai. Tuzo Dhorm khoro ani mhozo-i Dhorm khoro. Ami dogu-i ekam-mekam cho Dhorm som'zun gheum-ia ani ekam-mekank bhou'manan vagoum-ja. Sogllea Dhormam vixim amkam sarko bhouman asa.

Hi nit mukhar dourun 'Gomant Bharati' nanvan-chi ek sonvstha *institution* ami suru keli. Fattlea char vorsam thaun ti Goenkaram modem vaur korta. Aiz ami novo vaur suru kela. Devnogri lipi nok'llo asleléa amchea Goenkar bhavam khatir hem pot'r suru kelam. Amchi bhas vaddchi, amchi soros'pot vaddchi, Konkanni bhaxecheo bhoinnbhaso aiz khuim pauleat hem amchea lokak dakhouchem; ami fuddem sortole zalear kitem korunk zai hem sangchem, amchea somazant koslim koslim unnim asat hem sangchem, bi zaitim kamam korpachi amchi it'sa asa. Ami Rhuimcheach Party-che nhuim. Amkam khuimcheach 'ism' cho prochar korpacho na. Munis-zatik fuddem vhorpi jem kitem asa tem magir Europantlem asum. Asiantlem asum, Indientlem asun, Americantlem asum, Hindum-che asum, Cristanvam-chem asum-tem sogllem amchea loka mukhar dourop, amchi jinn nirmoll, udar ani tejixtt korop-bi zaitim kamam korpachim asat.

Ghoddie hea pot'rachi bhas tumkam zodd vo kotthin disot; "oxem ami boroinat; hem Marathi dista" oxem-i ghoddie tumkam disot. Tori astana ami tumche lagim magtanv ki oxem tak'tiken mot dium nakat. Ami kitem boroitanv tem vachat, tacher chintat, tumkam kitem dista tem amkam sangat. Hea potrantli bhas zata titli sompi ami kortoleanv. Punn amkam amchi bhas vaddounk zai hem visrum nakat.

Ho nomuneacho ank tumchea ixttank dakhoiat ani tacho zata titlo prochar korat. Ami tum'chi seva korchi oxem tumkam dis'lem zalear ami don mhoineam-nim tumche sevek eteleanv.

Dev tumkam borem korum.

Tumcho

**Ravindra Kelekar.**

*(गोमन्त भारती, नमुनो आंक, ६ एप्रील, १९५८.)*



# क्या हम देश बोन्साय लोगों का होने देंगे...?

साहित्य अकादेमी की महत्तर सदस्यता यानी फेलोशीप साहित्यकारों की दुनिया का सबसे बडा गौरव माना जाता है। अकादेमीने मुझे इस काबिल समझा इसके लिए अकादेमी के सभी सदस्यों का हृदयपूर्वक आभार मानना मेरा परम कर्तव्य है। मेरे सौभाग्य से करीब करीब सभी सदस्य यहाँ मेरे सामने बैठे हुए हैं।

'बहुत बहुत शुक्रिया!'

यह सम्मान ऐसें एक लेखक को दिया जा रहा है, जिसकी भाषा को कल परसों तक बडे बडे लोग भाषा ही मानने के लिए तैयार नहीं थे। इसकी लिपि नहीं है, व्याकरण नहीं है, इसमें साहित्य नहीं है कहकर खुद यह भाषा बोलनेवाले भी उसका उपहास किया करते थे। यह भाषा अगर आज अकादेमी की महत्तर सदस्यता जैसा सम्मान पा सकी है, तो उसका सारा श्रेय उन लोगोंको को जाता है, जो इस भाषा को 'भाषा' बनाने के लिए पिछले पचास साठ सालों से लगातार तीव्र संघर्ष करते आए हैं। उनका स्मरण करना भी मेरा एक बड़ा कर्तव्य है। बडी नम्रता के साथ मैं उन सभी ज्ञात अज्ञात 'कोंकणी *फायटर्सो*' को - संघर्षकर्ताओं को- अभिवादन करके उनकी उपलब्धि के लिए उन्हें बधाई देना चाहता हूँ।

साहित्य अकादेमी की स्थापना हुई तब - मेरी याददाश्त मुझे धोखा न देती हो तो - डॉ. राधाकृष्णनजी ने भारतीय साहित्य की व्याख्या यों की थी - भारतीय साहित्य एक है, हालांकि वह अनेक भाषाओं में लिखा जाता है। Indian Literature is one though written in several languages. इस का मतलब यह है कि हम भले ही अपनी अपनी भाषाओं में लिखते रहें, हम महज उस भाषा के लेखक नहीं हैं। बल्कि भारतीय लेखक हैं।

आत्मसंतोष के लिए यह टॉनिक अच्छा है। मगर यह आत्मसंतोष हमें अक्सर भुलावे में डालता आया है - आत्मवंचना में परिणत हुआ है। खुली आंखों से जब हकीकत की ओर हम देखेंगे तब हमारा दिल बैठ जायेगा। अगर हम इतने बडे देश के लेखक हैं, तो बताइए, हमारी पुस्तकें इस देश में कौन पढते हैं? कितने लोग पढते हैं? पुस्तकों का पहला संस्करण कितनी प्रतियों का छपता है?

पिछले पचीस तीस सालों में कोंकणी में मेरी करीब पचीस पुस्तकें प्रकाशित हुई हैं। ज्यादातर पुस्तकों का पहला संस्करण १००० प्रतियों का निकला था। हमने देखा कि १००० प्रतियाँ समाप्त होने के लिए करीब दस साल लग जाते हैं। तुरंत दुसरा संस्करण निकालनेकी हमारी हिम्मत ही नहीं पडती। कम-से-कम बीस

साल तक इंतजार करना पडता है।

कोंकणी तो छोटी भाषाओं में से एक है। हिन्दी? वह तो सबसे बडी भाषा है न? देश की राष्ट्रभाषा भी है। राष्ट्रभाषा अगर न होती तो भी वह पंजाब, हरियाना, हिमांचल, राजस्थान, मध्यप्रदेश, उत्तर प्रदेश, बिहार के लोगों की भाषा है न? इतने बडे क्षेत्र की भाषा की किसी भी पुस्तक का पहला संस्करण कम-से-कम एक लाख प्रतियों का छपना चाहिए था। कितनी प्रतियों का छपता है? कोंकणी की मेरी *'ओथांबे'* पुस्तक का हिन्दी में अनुवाद हुआ है। *पतझर में टूटी पत्तियाँ* के नाम से प्रकाशित हुआ है। प्रकाशन भी कोई मामूली प्रकाशक ने नहीं बल्कि ज्ञानपीठ जैसी एक बडी संस्था ने किया है। उसके ब्लर्ब पर 'कोंकणी की यह एक अद्‌भुत रचना है' बताया गया है। प्रतियाँ कितनी छपी हैं? सिर्फ एक हजार!

इस हालत की वजह ढूँढने की कोशिश करता हूँ तब मुझे सभी देशी भाषाओं के सिर पर एक काला बादल मंडराता हुआ दिख पडता है - भारत नामक इस 'सार्वभौम प्रजासत्ताक' देश में अंग्रेजी की प्रधानता का। इस आज़ाद देश का राजकारोबार अंग्रेजी में चलता है। यहाँ तक कि पंचायत के स्तर का भी अंग्रेजी में चलता है। कम-से-कम गोवा में। कानून अंग्रेजी में बनाये जाते हैं। न्यायदान अंग्रेजी में चलता है। लिहाजा बडी बडी नौकरियाँ अंग्रेजी पढे लिखे लोगों को ही मिलती हैं। यही नहीं, अंग्रेजी हमें 'स्टेटस' भी देती रही है।

ऐसी हालत में आप मातृभाषाओं के चाहे जितने महिमास्तोत्र गाते रहिए, किसी पर भी उसका असर होनेवाला नहीं है। लोग दिन ब दिन अंग्रेजीदां ही बनते रहेंगे। इस हालत में देशी साहित्य कतई नहीं पनप सकता। कोई 'पढ़ा लिखा' आदमी हमारी पुस्तकें नहीं पढ़ेगा। अंग्रेजी पुस्तकें ही पढ़ता रहेगा।

मैं यह कहना नहीं चाहता कि अंग्रेजी के ज्ञान की हमें आवश्यकता नहीं है। है - अवश्य है। सिर्फ इसलिए कि वह हमें विश्व साहित्य के संपर्क में रखती है। मगर कितने लोगों को इस भाषा का ज्ञान होना चाहिए? देश के सौ फीसदी लोगों को? नामुमकीन है। पांच प्रतिशत काफी है। वह भी नौकरिओं की तलाश में अमरीका, कॅनॅडा, इंग्लंड, ऑस्ट्रेलिया ज़ैसे देशों में जो जाते हैं, उनकी सहूलियत के लिए। देश के राजकारोबार के लिए, देश के विकास के लिए हर्गिज नही। यह सारे क्षेत्र देशी भाषाओं के हैं। जर्मनी, फ्रांस, जापान, चीन, रूस जैसे देश अपनी अपनी भाषाओं में राजकारोबार चलाते हैं, विकास कर सकतें हैं, तो क्या हम नहीं कर सकते? अगर नहीं कर सकते तो हमारी 'प्राचीन और उज्ज्वल संस्कृति' की बकवास छोड देनी चाहिए। जो अंग्रेजी के सामने घुटने टेकती है, वह गर्व करने लायक संस्कृति हो ही नहीं सकती।

हम चाहे जितने अंग्रेजीदां बनने की कोशिश करें, कभी भी अमरीकी, अंग्रेज नहीं बन पायेंगे। आंतरराष्ट्रीय तो बिलकुल नही। सिर्फ अपनी भूमि से उखडे हुए uprooted होंगे। Out of place everywhere, at home nowhere. न घर के न घाट के।

अंग्रेजी की कई परिसीमाएँ हैं। वह हमें दुनिया के साथ जोडती तो है, पर अपने लोगों से तोडती भी है। अध्यात्म की दुनिया में अनपढ श्रीरामकृष्ण देश के कोने कोने में पहूँच सके हैं। साईंबाबा भी पहूँच चुके हैं। मगर शंकराचार्य के बाद जिन्होंने भारतीय तत्वविचार में मौलिक योगदान दिया ऐसे देश के दो महापुरुष - श्री ओरोबिन्दो और जे. कृष्णमूर्ति महज आलसी, फॅशनेबल, निकम्मे अंग्रेजीदां लोगों के बीच ही फंसे रहे। राजनीति के क्षेत्र में एम्.एन्. रॉय कोई मामूली व्यक्ति नहीं थे। एक तगडी शख्सियत थे। क्रांतिकारी थे, एक मौलिक चिंतक भी थे। मेक्सिको की क्रांति के एक अग्रदूत थे। और लेनिन के दाहिने हाथ थे। देश की कोई भाषा जानते नहीं थे। यहाँ तक कि अपनी जन्मभाषा बांग्ला भी भूल गये थे। देश के स्वतंत्रता संग्राम मे हिस्सा लेने के लिए आये थे। मगर लोगों के साथ बिलकुल घुलमिल न सके - मुंबई और कोलकाता विश्वविद्यालयों के कुछ प्राध्यापकों के और बुदधिजीवियोंके दायरे में ही फंसे रहे।

जड़ें काटकर बड़े बड़े वृक्षों को बौने बनाने की एक कला जापानियों ने विकसित की है। नारियल का पेड जो गगन को छूने के लिए ऊपर तक जाता है उसे सिर्फ पांच फूट ऊंचा इस कला के द्‌वारा बनाया ग़या मैने देखा है। बडा ही सुंदर दिखाई देता है। मगर वह नारियल नहीं दे पाता, दिवानखाने की शोभा बढ़ाने के ही काम आता है। इस कला को बोन्साय कला कहते हैं। अंग्रेजी ने हमारे देश में कई बोन्साय विद्‌वान, बोन्साय बुद्‌धिजीवी, बोन्साय लेखक और अब तो बोन्साय पाठक भी निर्माण किये हैं। परिसंवादों की शोभा बढ़ाने के काम आते हैं। ठोस कुछ भी नहीं दे सकते। क्या हम देश बोन्साय लोंगों का होने देंगे? हमें यह भूलना नहीं चाहिए कि भगवान की सृष्टि से बढ़िया प्रतिसृष्टि निर्माण करने की ताकत रखनेवाले विश्वामित्र जैसे ऋषि इस देश में पैदा हुए हैं। उसे क्या हम बोन्साय लोगों का देश बनने देंगे? नहीं न? तो फिर देश में अंग्रेजी की जो प्रबलता है उसके खिलाफ विद्रोह करना निहायत जरूरी हो गया है। कौन करेगा यह विद्रोह? कोई राजनीतिक नेता? एक नरशार्दुल था, जिसने, यह विद्रोह शुरू किया था - डॉ. लोहिया। अचानक ही चल बसे। अब? मेरी दृष्टि देशी साहित्यकारों की ओर जाती है। विक्टर ह्युगो बड़े गर्व के साथ कहा करता था- इटली ने रिनेसांस का आंदोलन चलाया। जर्मनी ने रिफॉर्मेशन का चलाया और योरप बदला। फ्रांस ने सिर्फ एक वॉल्तेर पैदा किया। उसने रिनेसांस, रिफॉर्मेशन के साथ साथ आधा रेव्होल्युशन चलाया और न सिर्फ फ्रांस की बल्कि पूरे योरप की शक्ल सूरत ही बदल डाली। ऐसा कोई एक वॉल्तेर देश की किसी एक भाषा में पैदा होगा, तभी -

आज की हालत जडमूल से बदल जायेगी।

इन शब्दों के साथ मैं फेलोशिप के इस गौरव का बडी नम्रता से स्वीकार कर रहा हूँ।

# रवीन्द्र केळेकार : बरपावळ



## कोंकणी

१९५५ : **सत्याग्रह** (सत्याग्रहाची विसकावणी: मनन आनी कांय अणकार)
गोमंत भारती प्रकाशन, मुंबय

१९६० : **अशे आशिल्ले गांधीजी** (६ वांटे, गांधीजींच्या जिवितांतले कांय म्हत्वाचे प्रसंग).
गोमंत भारती प्रकाशन, मुंबय

१९६१ : **कथा आनी काणयो** (कांय रुपक कथा)
गोमंत भारती प्रकाशन, मुंबय

१९६२ : **आमची भास कोंकणीच** (कोंकणीचो प्रस्न संवादाच्या रुपान समजावन सांगपी पटी)
कोंकणी भाशा मंडळ, गोंय

१९६२ : **शाळेंत कोंकणी कित्याक?** (कोंकणी माध्यमाचो प्रस्न समजावन सांगपी पटी)
कोंकणी भाशा मंडळ गोंय.

१९७१ : **तुळशी** (नवलिका)
जाग प्रकाशन, प्रियोळ

: **वेळेवयल्यो घुलो** (दिसपटी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७३ : **भज गोविन्दम्** (शंकराचार्याच्या एका स्तोत्राची अर्थावणी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७३ : **उजवाडाचे सूर** (कांय ललीत निबंद)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७४ : **भौ भाशीक भारतांत भाशेचें समाजशास्त्र** (देशाच्या भाशीक प्रस्नाची चर्चा)
कोंकणी भाशा मंडळ, मडगांव

१९७६ : **हिमालयांत** (भोंवडे-वर्णन)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७७ : **सांगाती** (चिंतनां)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७९ : **राजा राणी** (भुरग्यां साहित्य: काणी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९८० : **ब्रह्मांडांतलें तांडव** ( नक्षत्रविद्येच्या उजवाडांत अंतराळांतली एक भोंवडी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९८५ : **महाभारत - एक अनुसर्जन** (दोन खंड)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९९५ : **Tullxi** (नवलिका)

रोमी लिप्यंतर: फेलीक्स कार्दोज
गुलाब प्रकाशन, पणजी

: **उजवाडाचे सूर** (ललीत निबंद)
निवळावन वाडयल्ली दुसरी उजवाडावणी
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९९६ : **समिधा** (वैचारीक लेख)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९९८ : **तथागत** (गौतम बुद्‌धाची जीण आनी सांगणी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९९९ : **ओथांबे** (चिंतनां)
माणिकपद्‌म प्रकाशन, बांदोडें

२००० : **घुसपल्लें जानवें** (लळीत-गंभीर बरपां)
जाग प्रकाशन, प्रियोळ

: **पांथस्थ** (आपजीण)
राजहंस वितरण, पणजी

: **सर्जकाची आंतरकथा** (साहित्य सेवेंत घडिल्ले दिश्टावे)
जाग प्रकाशन, प्रियोळ

२००३ : **आमोरेर** (निबंधां झेलो)
जाग प्रकाशन, प्रियोळ

२००५ : **भारतवर्षाची संस्कृतायेची साधना** (वैचारीक)
बिंब प्रकाशन, पर्वरी

: **तीन पावलां प्रज्ञावादाचीं** (वैचारीक)
माणिकपद्‌म प्रकाशन, बांदोडें

: **अघळ-पघळ** (चिंतनां)
गोवा कोंकणी अकादेमी, पणजी

२००७ : **वेळे वयल्यो घुलो** (दुसरी उजवाडावणी)
जाग प्रकाशन, प्रियोळ

: **आशिकुशीक** (चिंतनां)
जाग प्रकाशन, प्रियोळ

## हिन्दी

१९८५ : **महात्मा गांधी - एक जीवनी** (जिवीत)
कॉंग्रेस शताब्दि समारोह प्रकाशन, दिल्ली

१९८६ : **काकासाहब कालेलकर** (जिवीत)
नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

१९९० : **काकासाहब कालेलकर-अधिकृत जीवनी** (जिवीत)
प्रकाशन विभाग, भारत सरकार

## मराठी

१९६४ : **कोंकणीचें राजकारण** (कोंकणीच्या प्रस्नाच्या राजकी आंगाची विसकावणी)
नव-गोमन्त प्रकाशन, मडगांव

१९७० : **जपान जसा दिसला** (भोंवडे वर्णन)
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे

: **ज्ञाननिधीच्या सान्निध्यांत** (संवादांतल्यान काका कालेलकरांची वळख)
वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबय

## रुपकार

१९६२ : **नवी शाळा** (शिक्षणाच्या एका नव्या प्रयोगाची कथा)
मूळ गुजराती: *दिवास्वप्न*, बरोवपी: गिजुभाई बधेका
गोमंत भारती प्रकाशन, मुंबय

१९७५ : **मुक्ती** (दोन नाटकुलीं)
क्लॉड हॉटनचे The Masks and the Faces कथेचेर आधारून बरयल्लें एक नाटकुलें आनी ॲडवर्ड आल्बीच्या The Zoo-Story नाटकुल्याचो रुपकार.
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७६ : **लाला-बाला** (नाटक)
मूळ फ्रेंच: *L'invitation au Chateau*
बरोवपी : ज्यां आनुयी
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९७७ : **तीन एके तीन** (तीन नाटकुलीं)
रेमाबेन गांधी, मधु राय आनी लाभशंकर ठाकर हांणी बरयल्ल्या तीन गुजराती नाटकुल्यांचे रुपकार.
जाग प्रकाशन, प्रियोळ

## अणकार

१९५५ : **महात्मा** (कोंकणी, महात्मा गांधींक दिल्लीं आर्गां - अणकार आनी संपादन)
गोमंत भारती प्रकाशन, मुंबय

: **मानवता के झरने** (हिन्दी)
मूळ गुजराती: *मानवतानां झरणां*, बरोवपी: ग. बा. मावळंकर
सस्ता साहित्य मंडल, दिल्ली, हिन्दुस्तानी प्रचार सभा, वर्धा.

१९५८ : **जीवनलीला** (हिन्दी)
मूळ गुजराती: *जीवनलीला,*
बरोवपी: काका कालेलकर
नवजीवन प्रकाशन मन्दिर, अहमदाबाद

१९८४ : **... आनी तांकां मनशांत हाडले** (कोंकणी)
मूळ गुजराती: *माणसाइना दिवा*
बरोवपी: झवेरचंद मेघाणी
साहित्य अकादेमी, दिल्ली

१९९५ : **सगळे मनीस भावभाव** (कोंकणी)
मूळ इंग्लीश: *All Men Brothers*
बरोवपी: मो. क. गांधी

१९९५ : **हिन्दू-धर्म म्हळ्यार कितें?** (कोंकणी)
मूळ हिन्दी: *हिन्दू-धर्म क्या है?*
बरोवपी: महात्मा गांधी
नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया.

## संपादन

**महात्मा गांधींलीं पुस्तकां**

1960 : Bread Labour
: Trusteeship
1961 : Strikes
: Voluntary Poverty
1965 : Fasting in Satyagraha, its Use and Abuse
— : Truth called them differently (Gandhi-Tagore controversy).

हीं सगळीं पुस्तकां नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद, हे संस्थेन उजवाडायल्यांत. पयल्या चार पुस्तकांचे गुजराती आनी हिन्दी अणकारूय उजवाडा आयल्यात.

1965 : **Nation's Solemn Committments on Goa**
Jawaharlal Nehru,
Goa Daman Diu Territorial Congress

**काका कालेलकरांलीं पुस्तकां** (वळेरी पुराय ना)

१९६५ : **सत्याग्रहविचार और युद्धनीति**
सर्व सेवा संघ, वाराणसी

१९६६ : **शान्तिसेना और विश्वशान्ति**
सर्व सेवा संघ, वाराणसी

१९६६ सावन: **भारत दर्शन** (प्रवास वर्णनां)
चार वांटे: ४, ५, ६, ७
वोरा ॲण्ड कंपनी, मुंबय

१९६७ : **समन्वय-संस्कृति की ओर**
सर्व सेवा संघ, वाराणसी

: **राष्ट्रभाषा हिन्दी का मिशन**
कृष्णा ब्रदर्स, अजमेर

१९७० : **गांधी चरित्र कीर्तन**
नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद

: **युगानुकूल हिन्दी जीवनदृष्टि**.
भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन, दिल्ली

: **विनोबा और सर्वोदय क्रांति**
सर्व सेवा संघ, वाराणसी

: **गांधी युग के जलते चिराग**
कृष्णा ब्रदर्स, अजमेर.

१९७१ : **गांधीजी का रचनात्मक क्रांतिशास्त्र भाग-१**
नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद

१९७३ : **स्वराज्य संस्कृति के संतरी**
कृष्णा ब्रदर्स, अजमेर.

: **गांधीजी का रचनात्मक कांतिशास्त्र**
**भाग-२**
नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद

## संकलन

१९६३ : A Bibliography of Konkani Literature in Devanagari, Roman and Kannada Characters,
Gomant Bharati Publications, Goa

## सदरां

स्वगत (नवप्रभा, १९८० ते १९९९)

समिधा (सुनापरान्त, १९८७-८७)

गवाय एका कल्पांताचो (सुनापरान्त १९८९-९०)

नदर संपादप्याची (जाग म्हयनाळें, १९८८-२००७)

स्वान्तः सुखाय (सुनापरान्त, )

## रवीन्द्रबाबांल्या पुस्तकांचे अणकार

१९७१ : **काका कालेलकर साथे विविध वार्तालाप**
(गुजराती)
*'ज्ञाननिधीच्या सान्निध्यांत'*चो अणकार
अणकारपीः सरोजिनी नानावटी
वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि. मुंबय

१९८९ : **गांधी युग के एक जंगम विदयापीठ में**
(हिन्दी)
*'ज्ञाननिधीच्या सान्निध्यांत'*चो अणकार
अणकारपीः साधना गुप्ता
आ. काका कालेलकर स्मारक निधी, दिल्ली.



१९९३ : **एका विचाराची जिवीत-कथा** (कोंकणी)
*''महात्मा गांधी - एक जीवनी'*चो अणकार
अणकारपीः माधवी सरदेसाय
जाग प्रकाशन, प्रियोळ

१९९९ : **'काकासाहब कालेलकर (१९९०)'**
(मराठी)
*'काकासाहेब कालेलकर'*चो अणकार
अणकारपीः हेमांगी नानिवडेकर
प्रकाशन विभाग, भारत सरकार

१९९९ : **काकासाहेब कालेलकर** (गुजराती)
*'काकासाहेब कालेलकर'*चो अणकार
अणकारपीः पुष्पाबेन
प्रकाशन विभाग, भारत सरकार

REG. NO GOA 130



Published by Dr. Jaivantrao Sardesai, owner of JAAG Monthly. 201 B, Saldel Apts. Rua De Saudades, Pajifond, Margao, Goa, and Printed at Printart Offset Printers, Kundaim Industrial Estate, Goa. Editor: Madhavi Sardesai